"स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांचीं उत्तम सेवा करा"

पंचवार्षिक

# * सिंहनाद *

प्रबलकारिणां दर्पान्धानां मदं प्रसृतं पुरा ।

सूचना.

पुस्तक प्रसिद्ध करण्यास अवधि थोडा राहिल्यामुळें व गुजराथेंत मराठी पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या मोठ्याच गैरसोयीमुळें बरींच अशुद्धें राहिलीं आहेत. तीं वाचक सुधारून वाचतील व त्यांबद्दल क्षमा करतील अशी आशा आहे.

संपादक.

संपादक

विष्णु माधव देशपांडे.



प्रकाशक

तरुण भारत मंडळ, अमदाबाद.

श्री समर्थ रामदास नवमी शके १८५०

४ मार्च १९२९

किंमत १ रुपया.

" स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांची उत्तम सेवा करा "

पंचवार्षिक

# * सिंहनाद *

प्रबलकरिणां दर्पान्धानां मदं प्रसृतं पुरा ।
चरमशमयद्यः पञ्चास्यः स्वतंत्रतयाचरन् ॥
शिरसि सहते पादाघातं कपेरपि सोऽधुना ।
धिगिह महतामस्वातंत्र्यान्नकेन पराभवः ॥

---

व्हावा ज्ञानरवीं झणीं उदयतां अज्ञान जावो लया ।
अभ्यासें प्रकटूनि येथ विमला ध्येयास साधावया ॥
गर्जोनी तुज "सिंहनाद" उठवा निद्रेतुनी सत्वरी ।
चैतन्या तरुणा वरी, निज करीं तूं भारता उद्धरी ॥

---

संपादक
विष्णु माधव देशपांडे.



प्रकाशक
तरुण भारत मंडळ, अमदावाद.

श्री समर्थ रामदास नवमी शके १८५०
४ मार्च १९२९

किंमत १ रुपया.

## संपादकीय मंडळ.

---

वि. मा. देशपांडे.

अ. स. गोडे. वि. ग. चांदोरकर.

र. ल. पवार. अ. गो. शिवकामत.

मुद्रको:—

आ पुस्तकनां पृष्ट १७ थी १२८ सुधी अने छेवटे १ थी २४ सुधीनां धी गुजरात प्रीन्टींग प्रेसमां शाह सोमालाल मंगळदासे छाप्यां, ठे. पांचकुवा–अमदावाद. अने प्रथम पृष्ट १ थी १६ धी गर्जना प्रीन्टींग प्रेस, भद्र–अमदावाद तथा पृष्ट १२९ थी १७२ सुधी वसंत मुद्रणालयमां घीकांटा–अमदावाद तथा बाकीनो भाग धी महेता प्रीन्टींग वर्कस, अमदावादमां छाप्युं छे.

आवृत्ति प्रत ५००

# श्रेष्ठांचे आशीर्वाद.

श्री

छावणी—इंदूर.

ता. १८ फेब्रुआरी १९२९

रा. रा. संपादक "सिंहनाद" यांस

सा. न. वि. वि. आपले पत्र व सिंहनादाची प्रुफे मिळाली. तरुणांच्या धटाडीला शोभेल असे शील, ज्ञान आणि तेजस्वी विचार या मासिकात बघून मनाला आनंद वाटला. लेख वाचताना लेखक विद्यार्थी आहेत असे न वाटता कसलेले साहित्य—सेवक आहेत असे भाषेवरून वाटते. आमच्या तरुणांच्या हृदयातील मृतप्राय उदासीनता, कमालीचा आळशीपणा आणि समाज—सेवेची बेफिकिर मनोवृत्ती बद-लण्याला 'सिंहनाद' कारणीभूत होवो अशी इच्छा प्रत्येक समाज—सेवकाला वाटल्यास नवल नाही. 'सिंहनादातील विषयमांडणी भारदस्त, ध्येयपूर्ण आणि उघड पण स्पष्ट लिहिण्याची पद्धती मासिक लोकप्रिय होण्यास खात्रीने मदत

देईल. मासिक तरुणा करिता असल्या मुळे लेखांचे व कथानकाचे स्वरूप आदर्श राहील या बद्दल जपावे. तरुणांचे आयुष्य समाजसेवा व साहित्यसेवा याकडे वळल्यास कारणीभूत होईल. आपल्या उद्योगात ईश्वर आपल्याला यश देवो आणि हे मासिक हिंदु समाजात शिरलेल्या नानाविध अनिष्ट सुधारणांचे वेड तरुण मुलामुलींच्या अंतःकरणातून काढून टाकण्यास मदत देवो व आर्यप्रवाह त्या जागी पुनरपि उदयाला आलेले दिसोत. या पेक्षा ज्यास्त मी काय लिहिणार ? अखेर धर्मबलाला पारखे झालेल्या तरुणानी धार्मिक बनण्याची प्रयत्न करावा. तरुणांचे उपासना दैवत श्रीमारुतीराय हवे. त्यात सगळे हवे. उपासनेचे महत्व तरुण विसरले आहेत. त्या मुळे दारिद्र्य, दुर्बलता, आणि विचारहीनता उत्पन्न झाली आहे. या सर्व अनिष्ट गोष्टी दूर करणे तरुणांचे कर्तव्य आहे. क. लो. हे. वि.

(सही) सौ. कमलाबाई किबे

श्री. ना. सी. फडकेः—दोन अंक पाहिले. प्रयत्न अत्यंत स्तुत्य आहे. अशा हस्तलिखित मासिकातूनच भावी मोठमोठ्या मासिकांचे लेखक व्हावयाचे असतात. मासिक अधिकाधिक निर्दोष व्हावे असे ईच्छितो. ६–९–१९२८

( सही )

श्री

नवी दिल्ली,
२७–२–२९

.........वि वि .........सिंहनाद मासिक पुस्तकाचें मूळचें हस्तलिखित मासिक मी पाहिले होते. हल्लीं ते छापल्यानें त्याला कायमपणा येईल. लहान हातांनीं पण कल्पक डोक्यांनीं व प्रसन्न मनांनी लिहिलेल्या या प्रथम वाङ्मय प्रयत्नाला यश येवो असा माझा त्याला आशीर्वाद आहे. कळावें...

(स्वाक्षरी) न. चिं. केळकर.

---

श्री कृष्णाजी विनायक वझे. पेनशनर इंजिनीअर.

नाशीक.

अहमदाबाद येथील 'तरुण भारत मंडळानें' चालविलेले 'सिंहनाद' नांवाचे मासिक पुस्तक पाहिलें. तरुण मंडळींनीं उगीच पत्ते वगैरे खेळण्यात वेळ घालविण्यापेक्षां असले काम करणे फार चांगले. नवीन ग्रंथवाचन, वाचलेल्यांचे मनन व त्यानंतर त्या माहितीचे लेखन झाले म्हणजे ती माहिती अंगीं मुरते. आपले विचार आपण कागदावर मांडूं लागलों म्हणजे त्यांतील चुका व त्यांचा कोतेपणा उत्तम प्रकारें

आपल्या निर्दशनांस येतात. विचारांत (मनोराज्यांत) आपणांला पूर्ण स्वातंत्र्य आहे; उच्चारांत, भाषेंत, विचार प्रकट करण्यांत दुसऱ्यांची मनें न दुखवतील अशी खबरदारी घेतली पाहिजे, व आचारांत तर आपणांस अत्यंत सावधगिरीने मागेपुढे पाहून वागलें पाहिजे या गोष्टीचें वळण लागणें फार इष्ट आहे. या दृष्टीनें हा प्रयत्न फार स्तुत्य असून महाराष्ट्र समाजांतील विद्वानांनीं हे लेख वाचून पाहून त्यांस योग्य वळण लावण्याची खबरदारी घ्यावी

१।१०।१९२८

(सही)

---

श्री. ज. स. करंदिकर. (दुय्यम संपादक–केसरी.)

तरुण भारत मंडळानें चालविलेल्या 'सिंहनाद' हस्तलिखित मासिकाचें अंक चाळून पाहिले. विद्यार्थ्यांत लेखनाची व चित्रकलेची आवड वाढत्या प्रमाणावर आहे. हें या मासिकांतील लेखावरून चित्रावरून दिसून येते. विद्यार्थ्यांनीं हा व्यवसाय असाच उत्सुकतेनें चालवावा, म्हणजे त्यांत त्यांचा स्वार्थ व परमार्थही आहे.

सही—

६–२–२६.

श्री. ग. ना. कानिटकर—

सिंहनादाचे दोन अंक वाचून फार आनंद झाला. अशा मासिकांचा अहमदाबाद ठिकाणीं—कीं जेथे शाळांतून शिकण्याचे माध्यम (Medium of Instruction) मराठी नसून गुजराथी आहे—अत्यंत उपयोग झाल्याखेरीज राहणार नाहीं. व या दृष्टीनें प्रत्येक महाराष्ट्रीयानें अशा कार्याला, प्रत्यक्ष कृतिनें प्रोत्साहन देणे जरूर आहे. या योगानें मराठी भाषा चांगल्या रितीनें लिहू इच्छणाऱ्या विद्यार्थ्यांना शुद्ध मराठी लिहण्याची संवय होऊन महाराष्ट्रापासून दूर परप्रांतात रहाणाऱ्या महाराष्ट्रीय मंडळींची मातृभाषेची ओळख बुजते कीं काय अशी कित्येकांस सकारण भीती वाटते, ती वाटण्याचे कारण राहणार नाहीं. हें मासिक उत्तरोत्तर भरभराटीस येऊन चिरायु होवो. ७—९—१९२८.

सहीः—

## सिंहनादाला उदार हस्तानें सहाय्य करणाऱ्या मंडळींची नांवें:—

---

| | | |
|---|---|---|
| (१) | श्री. रा. गो. कवठेकर ( विव्हिंग मास्तर ) | २१–०–० |
| (२) | ,, वि. र. मनोहर ( मॅनेजर वेस्ट कोटन मिल्स ) | १५–०–० |
| (३) | ,, वा. रा. देव ( विव्हिंग मास्तर ) | १०–०–० |
| (४) | ,, मा. ना. पै ( विव्हिंग मास्तर ) | १०–०–० |
| (५) | ,, ना. स्वा. लोकूर ( डिस्ट्रीक्ट जज्ज ) | १०–०–० |
| (६) | कुमारी लीलावती धडफळे | १०–०–० |
| (७) | श्री. डॉ. बापुसाहेब तळवळकर | ५–०–० |
| (८) | श्री. गो. ह. कोठावळे ( डाईंग मास्तर ) | ५–०–० |
| (९) | ,, इ. ग. पंडित | ५–०–० |
| (१०) | ,, अ. स. वर्णीकर ( इन्जीनिअर ) | ५–०–० |
| (११) | ,, रा. गो. पाटील ( वकील ) | ५–०–० |
| (१२) | ,, वा. श्री. कानेटकर | ५–०–० |
| (१३) | ,, आचार्य ग. स. आठवले | ५–०–० |
| (१४) | ,, त्रि. रा. भागवत ( विव्हिंग मास्तर ) | ५–०–० |
| (१५) | ,, स. ह. शेवडे | ५–०–० |
| (१६) | ,, बावडेकर ( आसिस्टंट डिस्ट्रिक्ट जज्ज ) | ५–०–० |
| (१७) | ,, गो. स. जागुष्टे | ५–०–० |
| (१८) | ,, शं. पु. वर्दे ( मॅनेजर बॉम्बे गॅरेज ) | ५–०–० |
| (१९) | ,, वि. ग. दाते | ५–०–० |
| (२०) | ,, डॉक्टर वाणी बंधू | ३–०–० |
| (२१) | ,, दिगम्बर रघुनाथ अभ्यंकर | ३–०–० |
| (२२) | कुमारी कुसुम शंकर देशपांडे | ३–०–० |
| (२३) | श्री. शं. ग. करंदिकर ( इन्जिनिअर ) | ३–०–० |

(२४) कुमारी पंडित भगिनी २-०-०
(२५) श्री. त्र. ह. हेगिष्टे २-०-०
(२६) " भा. ग. पोतनिस २-०-०
(२७) " म. रा. लिमकर २-०-०
(२८) " राजगुरु २-०-०
(२९) " ग. द. स्थळेकर २-०-०
(३०) " वि. मा. गोळवेलकर
[कापडाचे व्यापारी] २-०-०
(३१) " शि. सो. माडिये
[ बाईन्डर आणि रुलर ] २-०-०
(३२) डॉ. कुमारी शारदाबाई पंडित २-०-०
(३३) श्री. द. ग. कर्णीक २-०-०
(३४) " ग. र. वैशंपायन २-०-०
(३५) " ग. वि. आपटे ३-०-०
(३६) " क्ष. ३-०-०
(३७) " बा. आ. दिघे.
[ बंगलो सुपरिनटेंडेन्ट, बडोदे. ] २-०-०
(३८) " द. के. गुप्ते २-०-०
(३९) सौ. विमलाबाई वेलिंगकर ५-०-०
(४०) श्री. त्र्यं. नि. बापट ३-०-०
(४१) " भा. आ. फणसे २-०-०
(४२) " ग. गो. कोराण्णे ११-०-०
(४३) " रा. वि. संत ५-०-०
(४४) " माबुलीकर [ चित्रकार ] २-०-०
(४५) " वा. कृ. रिसवडकर वकील २-०-०

पंचवार्षिक.



# सिंहनाद



## विषयानुक्रमणिका.

क्रमांक. पृष्ठांक.

क्रमांक. पृष्ठांक.

# —: प्रस्तावना. :—

व्याघ्र–सिंह भयानक । देखोनि भयचकित होती लोक ॥
परी त्यांची पिलीं निःशंक । तयां पुढें खेळती ॥ दा. बो.



सबंध जगाला स्वधर्मरक्षणार्थ स्वराज्याची आवश्यकता पटवून देऊन, महाराष्ट्रांत 'नानागुप्त मंडळें' स्थापून हिंदुपद–पादशाही स्थापित करण्यास अविश्रांत परिश्रम करणाऱ्या श्रीसमर्थरामदासस्वामींच्या पुण्यतिथिच्या दिवशीं कित्येक दिवस लांबणीवर पडलेला सिंहनाद प्रसिद्ध करण्याचें महाभाग्य लाभलें त्याबद्दल श्री समर्थचरणारविंदी नमन करून, 'अंक प्रसिद्ध केव्हां होणार' असें विचारून विचारून निराशलेल्या वाचकांच्या, आणि कालाच्या धर्मानुसार देणगी दिलेलीहि विसरलेल्या आमच्या आश्रयदात्यांच्या सेवेस तरुणांची मनोदशा दिग्दर्शित करणारा सिंहनाद सादर करण्यास अत्यंत आनंद वाटतो.

सिंहनाद हे नियतकालिक गेलीं पांच वर्षें तरुण भारत मंडळा तर्फे प्रसिद्ध होत आलें आहे. या अवधींत आमच्या मंडळानें येथें चालविलेल्या चळवळींचें लोण जनतेपर्यंत पोहोंचवावें

आमच्या प्रारंभावस्थेंत असलेल्या संस्थेच्या कार्याचा अितिहास लोकांपुढे मांडावा व सिंहनादाला किंबहुना मंडळाला स्थायी स्वरूप प्राप्त करून द्यावे या हेतूनेंच आम्ही आजचा हा सिंहनादाचा पंचवार्षिक अंक छापून प्रसिद्ध करण्याची कल्पना काढिली. हस्तलिखित मासिकाचे महत्त्व विशेष असून लेखकांचा कवींचा आणि चित्रकारांचा आत्मा ज्यांत ओतलेला दिसून येतो त्यांची सर छापखान्यांतून बाहेर पडणाऱ्या मासिकांना नाही याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे व म्हणूनच सिंहनाद हा अितःपर आम्ही हस्तलिखितच चालू ठेवणार आहोत. आजपर्यंत सिंहनादाची हस्तलिखित मासिक या दृष्टीने झालेली प्रगति परतवाडा [वऱ्हाड] येथील प्रदर्शनांत मिळालेल्या पहिल्या पारितोषकानें सिद्ध झालीच आहे. त्याशिवाय श्री. ज. स. करंदीकर दुय्यम संपादक 'केसरी,' आचार्य ना. सी. फडके श्री. रावसाहेब वझे [नाशिक] सौ. यशोदाबाअी भट, श्री. आळतेकर, लोकमान्य लोकश्री श्रद्धानंदकार अित्यादि मंडळींचे आशीर्वाद सिंहनादानें प्रसंगोपात्त मिळविले आहेत. त्या आशीर्वादापैकीं कांहीं ह्यासोबत दुसरीकडे दिलेच आहेत.

सूर्योदयापूर्वी ज्याप्रमाणे प्रभातकाल असतो, फुलत्या फुलाच्या पूर्वी ज्या प्रमाणे मुग्ध कलिकावस्था असते त्याप्रमाणे प्रौढावस्थेपूर्वी अंतराळांत उडया मारणारे यौवन असते. आमचे सर्व लेखक यौवनाच्या प्रभात कालांत नांदत आहेत तारुण्याच्या मुग्ध कलिकावस्थेंत आहेत, तेव्हां

अर्थात् आमच्या वाचकांना तारुण्याच्या भराऱ्याशिवाय यौवनमनोदर्शा-च्या चित्रांशिवाय, युवावस्थेंतलि भावनांशिवाय दुसरें काय बघावयास सांपडणार ? परंतु ती आशादायी प्रभात, ती विकसणारी कलिका, ज्या प्रमाणें सर्वांनाच मोहून टाकते त्याप्रमाणे हा सिंहनाद, ही यौवन-विचार-कलिका सहृदय वाचकास मोहून टाकील. यांतलि कित्येक लेख भावनेच्या बळावर तर कित्येक ध्येयाच्या बळावर श्रेष्ठांना अेक क्षणभर तरी विचार करावयास लावून समवयस्क बंधुभगिनींच्या मुग्ध विचारांना गति देतील असें आह्मास वाटते.

लेखक वर्गांतील बहुतेक लेखक विद्यार्थी आहेत व त्यांचें सर्वच शिक्षण अगदी प्रारंभापासून गुर्जर भाषेतून झालेले असल्यामुळें, गुर्जर भाषेची छाप मराठी लेखनावर पडणे अगदी स्वाभाविक आहे असें असतांना ह्या लेखक मंडळींनी आपली माय-भाषा अगदी शुद्ध ठेवण्या चा आटोकाट प्रयत्न केल्याचें वाचकांना आढळून येअील; अितकेच नव्हेतर त्या परकीय शब्दांनी अेतद्देशिय शब्दांना अर्धचंद्र देऊन स्वतःचें प्रस्थ माजविले आहे ( की ज्या प्रस्थामुळे पुष्कळांना मराठी शब्द–संपत्ति वाढत आहे असे वाटते. ) व आमच्या मायभाषेचे स्वत्व नष्ट करण्याचा गुप्त कट चालविला आहे त्यांना जन्मठेप काळेपाणी दाखविण्याचा येथील महाराष्ट्रीय तरुणांनी प्रयत्न सुरू केला असल्याचे ह्या पुस्तकावरून दिसेल.

परकीय शब्दांनी मराठी शब्द संपत्ति वाढते किंवा मराठी भाषेची खिचडी होते हा महान वादाचा प्रश्न विद्वानांच्या वादार्थ महाराष्ट्रावर सोंपवून देऊन आपण परप्रान्तीयांनी मात्र " चंचुप्रवेशे मुसल प्रवेशः " करणाऱ्या परकीय शब्दा बद्दल वेळीच सावध रहावेव यावनी शब्दाला येथूनं पुढेतरी निदान चुलीपर्यंत येऊ देऊन ये[ म्हणजे पुढच्यापिढीला चुलीपर्यंत गेलेला शब्द नष्ट कसा करता येणार हा प्रश्नच उरावयाचा नाही. ) अशी परप्रान्तीय महाराष्ट्रीयांना सविनय विनंती आहे.

आमच्या पुस्तकातील आणखी सुधारणा म्हणजे दे. भ. श्री. न. चिं. केळकरांच्या टिळक चरित्राप्रमाणे अनुच्चारित अनुस्वारांची सदा लेखनांत होत असलेली खोगीर भरती कमी करण्याच्या प्रयत्न, आणि अआची बाराखडी श्रद्धानंदीय लिपींत लिहिण्याचा प्रयत्न होत.

ह्या सर्वच चळवळी व्यवहारांत आणताना आमच्या काही मित्रमंडळींनी विरोध दर्शविला होता व कदाचित् पुढेही होईल; परंतु कोणतीहि चळवळ, शंका, टीका आणि संमति या तीन पायऱ्या चढून गेल्या खेरीज यशस्वी होत नाही हें जाणूनच आह्मी या सुधारणेचा अवलंब केला.

आमचे लेखक तरुण असल्यामुळे त्यांची अविकसित कृति भूमातेच्या चरणीं रुजूं होवो, त्यांच्या कीर्तिपरिमलाने भूमी दरवळून जावो असा आशिर्वादांची आम्ही आशा करणें अगदी स्वाभाविक आहे. व त्याप्रीत्यर्थ आम्ही दे. भ. तात्यासाहेब केळकरांकडे दिल्ली धांवलो,

श्रीमती सौ. कमलाबाआी साहेब किबे यांच्याकेड अिदूरला धांवली व आनंदाची गोष्ट ही की, ह्यांनी त्वरित आशिर्वाद देऊन आम्हास उत्साहित केले ह्याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत.

ह्या अंकातील चित्रे श्री. मल्हारराव पुराणिक आणि खोपकर बंधू यांनी देऊन अंक सुशोभित करण्याचे श्रेय घतले ह्या बदल त्यांचे आम्ही आभारी आहोत.

पुस्तक छापून देण्याचा मक्ता येथील महाराष्ट्रीय ग्रंथ बांधणारे श्री. अेस. अेम. बदर्स यांनी घेतला होता. परंतु गीताजयंती, राष्ट्रीय आठबडा अित्यादि वायदे चुकल्यामुळे त्यांचा आमचा नेहमीच खटका उडायचा पण त्यांनी मनांत कांहींहीन ठेवतां त्यांच्या कडून होअिल तितके लवकर पुस्तक छापवून आणि बांधून दिले त्याबद्दल त्यांचे आभार मानण्यास आह्मांस अत्यंत आनंद वाटतो.

हें पुस्तक छापण्याचे ठरल्यापासून आमचे बालमित्र श्री. श्री. स. शेवडे यांनी आमच्या साह्यार्थ अविश्रांत श्रम घेतले त्याबदल त्यांचे आणि त्याचप्रमाणें श्री. भा. स. शेवडे, रा. वैद्य, द. ग. कर्णिक. रा. अ. ग. पोतनीस' ना. प्र. खडकर, बाबुराव खोपकर, ल. रा. रेगे अित्यादी मंडळीनीं जो हातभार लाविला त्याबद्दल त्यांचेही फार आभारी आहोत.

हे पुस्तक तरुण मंडळींचेंच कार्य असल्यामुळें विचारानें, अनुभवानें आणि कृतीनें दोषविरहित आहे असें मुळींच नाहीं तरी पण हंसक्षीर न्यायानें श्रेष्ठांनीं हे पुस्तक पहावें हीच श्रेष्ठ मंडळींना आमची शेवटची विनंति आहे.

वि. मा. देशपांडे.







मरतमढयांनो अुठा. डोळ्यावरील झापड काढून टाका; दारिद्र्यामुळे गुन्हेगार बनलेल्यांनो जागे व्हा. ती पहा बंडखोर बुद्धि थैमान करूं लागली आणि अन्यायास ढोंगीपणाचे युगांत समाप्त झाले. गुलामगिरीत खितपत पडलेल्यांनो, जुन्या धर्मभोळया समजुतींना लाथाडून द्या आणि अुठा. जागे व्हा; आपण तावडतोब जुनी परिस्थिति बदलून टाकूं आणि स्वातंत्र्याच्या ध्येयप्राप्तीकरिता गुलामगिरीला लाथ मारूं. चला, स्वातंत्र्याच्या झेंडयाखाली अुभे रहा, ह्या अखेरच्या युद्धाला तोंड देअूं या.

रशियाचे विश्वगीत.



गर्जना इले. प्रि. प्रेस, भद्र अमदाबाद.

# सिंहनाद.

## शारदा मंदिर

( कः—कु. चपलाताई तळवलकर )

चालः—भूपाळी ( घनश्याम सुंदरा....... )

रत्नजडित आसनीं विराजे रम्यमूर्ति केवीं ॥ विराजे ।
शशिसूर्याहुनि दिव्य दिव्यतर सरस्वती देवी ॥ ध्रु ॥
चित्तशुद्धि करुनिया प्रथमही प्रसन्न मग काया ॥ राखणें ।
राज्यमार्ग हा भव्य दिसतसे मंदिरांत जाया ॥
उभयबाजुनी विद्या तरूंते बुद्धिलता वेष्ठिती ॥ तरूंते ॥
सद्गुण सिंचित पथीं शारदा भक्त कसे तिष्ठती ॥
आत्मोन्नति होतसे खचित कीं आक्रमिता पथ हा ॥
मोदें अर्पी कंठीं माला, श्री, सागरतनया ॥
अंतरा—सोपानमार्ग आला अतिकठीण खडतर आतां ॥
निश्चयें चढुनि त्यातें सोपाचि होय जातां ॥
जो त्वरें चढुनि गेला तो जगीं श्रेष्ठ ज्ञाता ॥
तयावरी ती प्रसन्न होउनि मंगलकर ठेवीं ॥ आपुला सत्शुभ ।
शशिसूर्याहुनि दिव्य दिव्यतर सरस्वती देवी ॥ १ ॥
मोदसयुर करि नृत्य निरंतर सभामंडपांत ॥ देविच्या ॥

सत्याचें तेजस्वी झुंबर लखलखतें आंत ॥
नानाविध बसावेलीं सुकवनें रत्नें तीं ज्यावर ॥
त्याच दिव्य आसनीं शोभते वाग्देवी सुंदर ॥
षट्शास्त्रांचीं नवरत्नें तन्मुकुटावरि शोभती ॥ देविच्या ॥
संगीताचीं दिव्यकुंडलें कर्णिं पहा डोलती ॥
अंतरा–सौभाग्य तिलकभालीं शोभला दिव्य कैसा ॥
जणुं शरत्पौर्णिमेचा चंद्रमा पूर्ण जैसा ॥
चमकला तयावरतीं शांतिचा बिजवरासा ॥
पंचप्राण आरती उजळुनि नमुनी पदकमला ॥ शारदे ॥
भावभक्तिनें प्रेमप्रीतिनें ओंवाळूं तुजला ॥ २ ॥

जानेवारी १९२८

---

## ईशस्तुति



( कवि श्री. भोरकर. )

—: गीति :—

हे रामराय दीना तारिशि तूं देउनी सर्वां हात ।
ई शा तुजविण अम्हां कोणी नाहींच संकटीं तात ॥ १ ॥
श्व—वृत्ति धरुनी आम्ही आजवरी लोळलों निरयतेंत ।
रा मा आतां विटलों करि झणिं आम्हासि संकटातीत ॥ २ ॥
आ तां जरी न काढिशि येइल मोठा कठीण बा काळ ।
म्हा तान्यासम अमुतें करील धिगूजीव परवश व्याळ ॥ ३ ॥
स क्रूर भूमीवरि जे शत्रुगणांना कृतांतसे होते ।

स्व लोंक बनविला हा दावुनि निज भास्कर प्रतापातें ॥ ४ ॥
'तं आनें वागावें' हे शब्द जयांस तप्त तैल सम ॥
त्र यस्थ लोकीं केलें त्यांच्या पौत्रास शुद्ध हतकाम ॥ ५ ॥
ता त्पर्य अतां आम्हा नाहीं कांहींहि अन्यगति रामा ।
दे ह्या संकट काळीं साह्य अम्हाला सुदीन–जनकामा ॥ ६ ॥

जानेवारी १९२५

---

( भद्र भजन समाजातर्फे झालेल्या गणेशोत्सवांतील मेळ्याकरितां
प्रो. आठवले यानीं केलेली पदें )

## पद १ ले

राग:–हमीर :: ताल:–दादरा
[ चाल:–विमल अधर निकटिं मोह हा ]
शिशुगण तव करित पदिं नती ॥ प्रेमं ॥
गणनायक देइ सुमति ॥ शिशु. ॥
नामस्मरण–कवच घालुनियां ।
सतत सकृती मिरवूं जगति ।
करित पदिं नती ॥ प्रेमें ॥ शिशु. ॥

## पद २ रें

राग:–सारंग .·. ताल:–केरवा.
प्रभुवर ! नामबळें तव आम्हीं ।
धर्मरणीं मिळवूं विजया ॥ प्रभु धृ ॥

परधर्मीयांच्या हल्यांत ।
संघबळानें परतवुं या ॥ १ ॥
आत्मशुद्धिच्या दृढ ढालेनें ।
बोथट करुं खड्ग अरिच्या ॥ २ ॥
आर्य धर्म हा उज्वल करुनीं ।
फैलावूं अखिल जगतीं या ॥ ३ ॥ प्रभु० ॥



# कवि आणि काव्य

ले. श्री. द. वि. बापट.

एखाद्या लहान मुलाला पाहिजे असलेली वस्तू मिळाली तर त्याला अतिशय आनंद होतो, व तो आनंद पोटांत मावेनासा होऊन सहज रीतीनें तें नाचूं लागतें व ज्याला त्याला सांगत सुटतें 'पहा मला काय मजा मिळाली' व ती वस्तु तें सर्वांना दाखवीत सुटतें. त्याचे मनोविकार इतके प्रबळ होतात कीं ते कोणालाच आवरत नाहींत. लोक आपल्याला काय ह्मणतील हा विचार त्याच्या मनांत मुळींच येत नाहीं. तें आपल्याच आनंदांत दंग. त्याला वाटतें कीं आपल्याला जसा आनंद होतो तसा सर्वांनाच होत असला पाहिजे. सर्व विश्व त्याला आनंदमय दिसत असतें.

कविची मनःस्थिती ह्या लहान मुलाप्रमाणेंच असते, व तो काव्य कां लिहितो याचें कारणही ह्या मनः-स्थितींतच सांपडेल, एखादी सुंदर वस्तू कवि पाहतो, त्या सौंदर्याचा त्याच्यावर इतका परिणाम

होतो कीं त्या लहान मुला प्रमाणें तो आपला आनंद दुसऱ्याला दाखविल्याशिवाय त्याच्या हातून राहवत नाहीं, खरा आनंद अथवा खरें दुःख असलें तर तें कधींही पोटांत राहात नाहीं, त्याला वाचा फुटते. कांटा टोचलातर 'अयय' असे शब्द सहजच बाहेर पडतात. खऱ्या आनंदाची गोष्ट तशीच आहे. साधारण लोक गद्यामध्यें आपले विचार प्रगट करितात; कवि काव्यांत करतो-हें काव्य त्याच्या लेखणींतून स्फूर्तीनें बाहेर पडतें, आतां ही स्फूर्ती उत्पन्न होण्याचें कारण अगदीं लहान असूं शकेल अगर गंभीर स्वरुपाचें असूं शकेल, नुकतेंच कोमेजलेलें फूल अगर उमललेला गुलाब, निबिड अंधःकार युक्त रात्रीं कृष्णमेघामध्यें चमकणारी विद्युल्लता किंवा प्रभातकाळीं उषादेवीनें धारण केलेलें रूप, प्रणयी दांपत्याची प्रथम रात्र किंवा पति निधनानंतर आलेला पुत्र निधनाचा प्रसंग, लढाईच्या वेळची धुमश्चक्री किंवा लहान मुलींची बाहुलीच्या खेळां-तील भांडणें ह्मणेज दिसण्याला क्षुल्लक किंवा अत्यंत गंभीर व भयानक अशा कोणत्याही प्रसंगीं खऱ्या कवीला त्याच्या मनोरचनेनुसार काव्यस्फूर्ती होईल. अगदीं विसदृश किंबहुना विरोधी अशागोष्टींत साम्यता हुडकून काढणें ह्मणजेच त्याच्या मुळाशीं असलेल्या एकाच तत्वाचें अन्वेषण करून जगापुढें ठेवणें किंवा अशा सर्वव्यापी सत्याचें अस्तित्व जगाला पटविणें हें कवींचें कार्य असतें.

अगदीं सामान्य वस्तूंकडे नव्या चष्म्यांतून पाहणें हें कवींचें वैशिष्टय आहे. मनुष्य स्वभाव हा अनादि कालापासून आहे तसाच आहे. सृष्टींत वारंवार तेच प्रसंग येत असतात. त्याच्यामध्यें नाविन्य तें काय असें मायावादी लोक विचारतील, पण कवींवर ह्या मायेचा ह्मणा, पाहिजेतर सत्याचा म्हणा-कारण कवि तर हें सर्व सत्य आहे असेंच म्हणत असतो

इतका पगडा बसलेला असतो कीं मायावादी लोक कवीला निरंतर बद्ध लोकांच्या यादींत, डॉक्टर जसा एखादी केस असाध्य म्हणून देतो, त्या प्रमाणें सोडून देतील, कवीला सर्व निरंतर नवेंच दिसतें, कालचा सूर्योदय त्याच्या मनांत एक तऱ्हेचे विचार आणील तर उद्याचा दुसरेच आणील, प्रत्यक्ष वस्तू तीच असली तरी कवीची मनःस्थिती निराळी त्यामुळें त्यानें केलेलें वर्णनही पण निराळें असतें.

एवढयावरून सहजच दिसून येईल कीं कवीचें वर्णन म्हणजे पाहिलेल्या गोष्टींची यादी नसून त्यामध्यें त्याचे विचारांचें प्रतिबिंबही पण पडलेलें असतें, कवि काय कोणताही चित्रकार काय, कोणचाही देखावा कसा असला तर जास्त शोभायमान दिसेल हें मनांत आणून कवि त्याचें वर्णन करितो, कवि जें सत्य सांगतो तें कोणच्याही एका कालचें नसून सर्व कालीन असतें.

रामायणाची गोष्ट घ्या. इतके दिवस तो ग्रंथ इतका लोकप्रिय होऊन कां राहिला आहे, याचें कारण कवीनें त्या ग्रंथा मध्यें अगदीं रूक्ष अशा हकिगतीचा इतिहास सांगितलेला नसून ध्येयरूप ( Ideal ) आर्यसंस्कृती म्हणजे काय होती व काय असली पाहिजे याचें भपकेदार चित्र काढलेलें आहे. ज्या चित्रांचा परिणाम कायमचा व्हावयास पाहिजे असतो तें अगदीं सर्वस्वी तसें काढून भागत नाहीं. तें कसें असावयास पाहिजे हें चितारी आपल्या मनामध्यें आणतो, आणि मग अशा रितीनें निर्दोष चित्र तो जनापुढें ठेवितो, तेव्हां त्या चित्राची वाहवा होते. याचा अर्थ असा नाहीं कीं कवीनें केलेलें वर्णन खोटें आहे अगर चिताऱ्याचें चित्र काल्पनिक आहे; याचा अर्थ इतकाच कीं ज्याचें महत्व थोडा वेळ राहणारें आहे असा भाग कवि गाळतो व त्यामध्यें चिरंतनचा जो

भाग आहे. तेवढाच चाळून घेऊन त्याचा उपयोग करितो, कारण तो हें जाणून असतो कीं जेवढें तिन्ही काळीं अबाधित राहणारें सत्य आहे तेवढेंच काळाच्या तावडींतून वांचतें, बाकीचें सर्व नाश पावतें, रामायण कदाचित सर्व काल्पनिक असूं शकेल पण सीतेच्या चरित्रांत दाखविलेला स्त्रीधर्म, रामाच्या चरित्रांत दाखविलेला पतिधर्म व पुत्रधर्म, व लक्ष्मणभरतादि कांचा बंधुधर्म हा खोटा आहे असें कोण ह्मणेल ? तो त्या वेळीं खरा होता, आतां खोटा आहे अशां तला भाग आहे काय ? तो निरंतर खरा ह्मणून रामायण टिकलें, वाल्मीकीचे बोल ४--५ हजार वर्षांपूर्वी जितके खरे होते तितकेच या घटकेलाही पण आहेत.

वर दिलेल्या रामायणाच्या उदाहरणावरून कदाचित् कोणी असें अनुमान काढील कीं कवि जी कविता लिहितो ती जगाला नीतीचे बोध देण्याला ह्मणूनच लिहितो, पण हें अनुमान बरोबर नाहीं. खरा कवि जी कविता लिहितो ती सर्व स्वयंस्फूर्तीनेंच लिहितो, वर्ड्स्वर्थनें ह्मटल्याप्रमाणें. ' Poetry is the spontaneous overflow of powerful feelings, ' ज्या काव्यांत कृत्रिमता आहे, ज्या काव्यांत प्रसवणारी भावना तीव्र नाही तें काव्यच नव्हे. अशी कविता लिहिणारे कवि ह्मणजे गडकऱ्यांच्या कवींच्या कारखान्यां तील मजूर होत यांत मुळींच शंका नाहीं. जगाला नीतीचे बोध देण्याला कवितेचा जन्म आहे असें ह्मणणेंच खोटें आहे. एवढें मात्र खरें कीं कवि हा सत्याशीं अगदीं भिडलेला असतो, त्याच प्रमाणें नीति तत्वाचा उपदेशक हाही सत्याशीं विलगलेला असतो. दोघांचे सिद्धांत एकाच पायावर उभे असल्यामुळें त्यांच्यामध्यें केव्हांकेव्हां एक-वाक्यता दिसून येते. पण त्याचा अर्थ असा नाहीं कीं ते दोघे एक

आहेत, अगर एकाचें कार्य दुसरा करितो अशांतलाही भाग नाहीं. दोघांचे प्रांत अगदीं तुटक आहेत.

कवि एखादी वस्तू अगर देखावा पाहतो. त्यामधील सौंदर्याचा इतका परिणाम होतो, त्याच्या आर्धी स्वभावतःच तीव्र असलेल्या भावना इतक्या उद्दीपित होतात कीं त्या त्याच्या तोंडांतून अगर लेखणींतून त्या शब्द रूपानें बाहेर पडतात. मग ते शब्द व ते विचार नीतितत्वांशीं जुळत असोत अगर नसोत. त्याची कवि मुळींच फिकीर करीत नाहीं तो आपला नवीनच शब्दसृष्टी उत्पन्न करुन ब्रह्मदेवाशीं स्पर्धा करुं पाहतो. शेवटी तो ह्या नव्या सृष्टींत इतका रममाण होतो कीं खऱ्या सृष्टीचें भान त्याला रहात नाहीं. त्याच्या कल्पनेच्या भराऱ्या मग क्षणांत स्वर्ग मृत्यु पाताळ सगळी कडे जाऊन पोहोंचतात. आणि ह्या भराऱ्या एकदा सुरु झाल्या कीं ज्या वस्तूपासून त्याला ही स्फूर्ती झाली त्याच्याशी अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं अशा इतर वस्तूंत त्याला सत्य दिसूं लागतें व त्या सर्वांचें आदिकरण एकच आहे असें प्रतिपादन करुं लागतो तेव्हां ह्या कवीनें तत्ववेष परिधान केलेला आहे कीं काय असा क्षणभर भास होतो.

मार्च १९२६



# समाज चित्र.

( लेखिका कु. मंदाकिनी पंडित )

**गंगा**धरपंत नांवाचें एक गृहस्थ आंग्रे यांचें वाडींत रहात असत. ते वकील होते. त्यांची वकीली साधारण बरी चालली होती त्यांना बरेंच दिवस मूल झालें नाहीं. ईश्वरकृपेनें त्यांना एक मुलगी झाली. त्या मुलीचें नांव लीला. गंगाधरपंत तिच्यावर प्राणापेक्षांही जास्त प्रेम करीत असत. ती ४–५ वर्षांची झाली तेंव्हांपासूनच ते तिच्यांत स्वतंत्र विचार उत्पन्न करण्याची काळजी घेऊं लागले. रोज संध्याकाळी कोर्टांतून घरीं आल्यावर ते तिला शिकवीत असत. अशा रीतीनें वडिलांच्या शिक्षणाखालीं ती मोठी झाली व तिचे विचारही फार प्रगल्भ झाले.

ती १३ वर्षांची झाली तेव्हां तिची आई ( रमाबाई ) मुलीच्या लग्नाबद्दल गंगाधरपंतांच्या मागें लागली. रमाबाई फार जुन्या विचाराची स्त्री ! तिला गंगाधरपंतांकडून मुलीला दिलें जात असलेलें शिक्षण मुळींच आवडत नव्हतें. ‘ इश्श मेलं. काय करायचंय बायकानां हें असलें शिक्षण ? कां त्यानां कुठं वकिली करायला जायचंय्, कां कुठं व्याख्यान द्यायला जायचंय् ? चुलीशी बसून भाकरी भाजतां आल्या कीं पुरें ’ असें उद्गार रमाबाईचे तोंडून वारंवार निघत. ती स्वतंत्र असती तर तिला तिच्या आवडी प्रमाणें करितां आलें असतें परंतु सर्व

कारभार पडला गंगाधरपंतांचें हातीं; त्यामुळें लीलेचें शिक्षणाचें बाबतींत रमाबाईचें कांहींच चाललें नाहीं.

लीला यंदा मॅट्रिक पास झाली. गंगाधरपंतांचे मनांतून तिला पुढील कॉलेज शिक्षण देण्याचा विचार होता. परंतु बायकोनें तर ४-५ वर्षांपासूनच तिच्या लग्नाबद्दल लकडा लावला होता. गंगाधरपंतांचा अगदींच नाइलाज झाला. त्यांनीं लीलेला योग्य वर शोधण्यास सुरुवात केली. सोलापूरचे दाजीसाहेब इनामदार यांचे चिरंजीव नारायणराव यंदाच बी. ए. झाले होते. व लवकरच त्यांचा बॅरिस्टर होण्यासाठीं विलायतेस जाण्याचा विचार होता. थोडेंच दिवसांत नारायणराव व लीला यांचे मोठ्या थाटानें लग्न झालें. लग्न होतांच लीला सासरी गेली व कांहीं दिवसांनीं नारायणराव विलायतेस जाण्यास निघाले. लीलेचा व त्यांचा सहवास जरी थोडयाच दिवसांचा होता तरी तिला पतिवियोग फारच असह्य वाटला. जातानां नारायणराव लीलेचा निरोप घेण्यास आले तेव्हां तिनें कालिदासाचें शाकुन्तलांतील ‘ रम्यान्तरः कमलिनी हरितैः सरोभिः.........शान्तानुकूलपवनश्च शिवश्च पन्थाः ॥’ हा श्लोक म्हणून अश्रुपूर्ण लोचनांनीं त्यांस निरोप दिला.

लीलेला सासरीं मुळींच करमेनासे झालें. सासरची सासऱ्याखेरीज सर्व मंडळीं अगदींच अशिक्षित होतीं. त्यांनां लीलेचे शिक्षण मुळींच आवडत नव्हते. तीं लीलेला तिचे शिक्षणाबद्दल फारच टोचून बोलूं लागलीं. नारायणरावांस विलायतेस जाऊन ८ महिनें झाले तों पर्यंत लीला सासरींच होती. पुढें एक दिवशीं गंगाधरपंत अतिशय आजारी असल्याचें पत्र आलें. लीलेचें पोटांत एकदम धस्स झालें तिला वडिलांची भेट कशी होते याची काळजी पडली.

सत्यभामाबाईंचे (लीलेची सासू) मनांतून लीलेला या प्रसंगींसुद्धां माहेरी पाठवावयाचें नव्हतेंच परंतु ह्याबाबतीत त्यांचें दाजीसाहेबांपुढें कांहींच चालले नाहीं. लीला माहेरी जावयास निघाली. सुदैवानें लीलेची व गंगाधरपंतांची भेट झाली, पण दुपारनंतर गंगाधरपंतांची प्रकृति जास्त बिघडत चालली व रात्रीं ८ वाजतां त्यांच्या आत्म्याने देह सोडला. लीलेला तर फारच वाईट वाटलें पण ती तिचेकडून होईल तितकें आईचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होती. १५ दिवस होतात तोंच लीलेचें सासरहून तिला पाठविण्याबद्दल पत्र आले नाइला-जास्तव रमाबाईंना लीलेला सासरीं पाठविणें भाग पडलें.

सून १५ दिवस माहेरी राहून आल्यावर तर सासूबाईनीं तिचा जास्तच छळ करण्यास सुरुवात केली. त्याचें कारण लीलेचें प्रथम लक्षांत आलें नाहीं. गंगाधरपंतांनीं आपली सर्व मिळकत एका धर्मार्थ संस्थेस दिली आहे हें ऐकून सत्यभामाबाईंना फार राग आला व आपल्या नारायणाचे वाट्यास कांहींच येत नाहीं असें जेव्हां त्यांना समजलें तेव्हां तर त्यांच्या संतापास पारावारच उरला नाहीं. लीला बिचारी काय करणार ! ती निमूटपणें सर्व ऐकून घेत होती. दैव एकदां फिरलें म्हणजें तें हातधुवून पाठीस लागतें म्हणतात ना त्याप्रमाणें झालें.

एके दिवशी दाजीसाहेब कांहीं कामाकरितां बाहेर गेले होते. तेवढ्यांत त्यांचे घरीं तार आली. घरांत लिहितांवाचतां येईल असें कोणींच नव्हतें, त्यामुळें तारवाल्याजवळून, सहीकरून, तार घेण्याचें काम लीलेवरच आलें–सत्यभामाबाईनीं स्वतःच तिला तसें करण्यास सांगितलें–लीलेनें सहीकरून दिली व तार फोडून वाचली. तार वाचतां वाचतांच ती एकदम बेशुद्ध होवून पडली. सत्यभामाबाईनां कांहींच समजेना

सुनेचे दोष काढवायाचे म्हणून 'झालं काय टवळीला येवढयांत, ढोंग करायला शिकली आहे दुसरं काय ! उठतां लाथ नि बसतां बुक्की पाहिजे म्हणजे येईल वठणीवर ' इत्यादीचा त्या तिच्यावर सारखा भडी-मार करीत होत्या. असा प्रकार चालला होता तोंच दाजीसाहेब घरीं आले. वरील स्थिती पाहून त्यानां कांहींच समजेना. त्यांनीं सत्यभामाबाईना विचारिलें, परंतु त्यांचेकडून कांहींच उत्तर मिळालें नाहीं. ते लीलेला बेशुद्ध पडलेली पाहून गोंधळून गेले, व इकडे तिकडे पाहूं लागले तोंच लीलेजवळ पडलेल्या तारेवर त्यांची दृष्टी गेली. त्यांनीं चटकन तार उचलली. त्यातील मजकूर वाचला. त्यांचा धीर अगदींच खचला. थोडावेळपर्यंत त्यांनां सर्वत्र अंधःकारच दिसत होता. कांहीं वेळानें ते शुद्धीवर येऊन बायकोस स्वतःच्या मुलाच्या शोचनीय मृत्यु-बद्दल सांगूं लागले, तों तिलाही आकाश कोसळल्याप्रमाणें झालें. दाजसाहेबानीं पुष्कळ उपाय केले परंतु लीला बराच वेळ पर्यंत शुद्धीवर आली नाहीं. मग डॉक्टर आणिला व डॉक्टरांच्या उपचारानीं लीला थोडया वेळांत शुद्धीवर आली.

दिवसांमागून दिवस लोटले व लीलेची स्थिती फारच शोचनीय होवूं लागली. तिला आतां राहिलेला काळ कसा क्रमण करावा याचा विचार पडला. जो तो तिला दुर्भागी समजूं लागला. तिचें तोंड पाहाणें म्हणजे अपशकून ! तिचें मन उदात्त विचारांनीं परिपूर्ण होतें, तरी सुद्धां तिला आलेल्या संकटास तोंड देणें कठीण पडलें. ती गतभर्तृका झाली त्यांत तिचा काय दोष ! लोकांचे अपशब्द तिच्या हृदयास डागण्या देत होते. बायको मेली असतां पुरुषाला समाज इतक्या वाईट तऱ्हेनें मुळींच वागवीत नाहीं परंतु स्त्रीचा नवरा मेला म्हणजे तिचें

सांत्वन करण्याचें ऐवजी तिला दुःखसागरांत लोटण्यास तयार होतो. लीलेला आतां घराबाहेर पाऊल टाकणें बंद झालें फुललेल्या फुलासारखा तिचा तो चेहरा आतां शोकरूपी कडक उन्हानें कोमेजून गेला.

लीलेला पाठिंबा देणारी व तिचे मनापासून सांत्वन करणारी कायती तिची यमूताई नांवाची शेजारीण होती. तिला लीला नणंदे-प्रमाणें मान देत असें. यमूताईचे एम्. ए. पर्यंत शिक्षण झाले होते. तिचा अविवाहित राहून समाजसेवा करण्याचा विचार होता. एकें दिवशीं सोलापुरास यमूताईंचे स्त्रीशिक्षणावर व्याख्यान होते. त्यावेळीं सत्यभामाबाई घरांत नव्हत्या म्हणून लीलेला घरीं एकटीं न ठेवतां तिला ती आपलेबरोबर व्याख्यानास घेऊन गेली. लवकरच सत्यभामाबाई देवास गेल्या होत्या त्या परत आल्या. सून घरीं नाहीं हें पाहून तर त्यांच्या तळव्याची आग मस्तकास पोंचली व त्या घरांत आदळ आपट करूं लागल्या. थोडयावेळानें यमूताई व लीला घरीं आल्या. सून घराची पायरी चढतांच सत्यभामाबाईंचे तोंड सुरु झाले. ' कुठं व्याख्यानाला गेली होतीस, पोट भरलं का व्याख्यान ऐकून ? थांब आज तुला जेवायलाच घालींत नाहीं; लाज नाहीं वाटत चार लोकांत तोंड दाखवायला ! तोंड काळं कर काळं ! कसली पांढऱ्या पायाची मिळाली ती माझ्या सोन्यासारख्या बाळाचा सत्यानास केला ! तूं गेल्याखेरीज ह्या घराचं कल्याण नाहीं व्हायचं. खबरदार मला विचारल्याविना घराबाहेर पडलीस तर. ' हें ऐकून लीलेला फार वाईट वाटलें. तिचे तोंड अगदीं उतरलें. तिला आतां जीव नकोसा झाला. पाषाणहृदयीं माणसास सुद्धां तिला पाहून दया आली असती.

## सिंहनाद.

असो लीला सासूबाईंचे सर्व बोलणें ऐकून घेऊन निमूटपणें कामाला लागली. आज ती जेवली नाहीं. रात्रीं घरांतील सर्वमंडळीं निजल्यावर तिनें परमेश्वरावर सर्व भार ठेवून आत्महत्या केली.

अरेरे! लीलेला शेवटींआत्महत्याच करावी लागली ना. बा समाजा ? तुला हें वर्तन कसें रे आवडले ! लीलेबद्दल तुला कांहींच वाटलें नाहीं ना ? लीलेचा दुःखदायक व हृदयद्रावक शेवट पाहून तरी तुला सहानुभूति वाटो.

जानेवारी १९२८



# विचार तरंग.

## वर्तमानपत्रें व गप्पाष्टकें

लेखक-श्री. के. रा. भिडे.

सांप्रत सुशिक्षित म्हटल्या जाणाऱ्या समाजांत इतर व्यसना-प्रमाणें वर्तमानपत्रें व गप्पाष्टकें यांचें व्यसन लागतें कीं काय अशी भीति वाटण्यास बरीच जागाआहे. साधारणपणें खोल विचार केल्यास वर्तमानपत्रांचे वाचनांपासून तादृश कांहींही लाभ नाहीं. नुसतीं महाराष्ट्र समाजांत येणारींच वृत्त व मतपत्रें वाचावयाचीं म्हटल्यास दिवसाचे निदान दोन तीन तास तरी लागतील. आणि इतक्यांचा लभ्यांश काय तर " रंगरावचा जय झाला " " डॉ. देशमुख निवडणुकींत हरले " अथवा " इंदूरकरांनीं राज्यत्याग केला " इत्यादि पुरे २४ तासही ताज्या न वाटणाऱ्या बातम्या आम्हांस कळतात. दुसऱ्या दिवसाला या सर्वांची किंमत शून्य ! असल्या नश्वर वाङ्मयांत-वाङ्मय कसलें तें-वेळ घालविण्या पेक्षां एकाद्या सर्वमान्य श्रेष्ठ ग्रंथाचें अध्ययन व परिशीलन किती तरी श्रेष्ठ होय. बाहेर जगांत काय चालतें याची अवश्य ओळख असावी. पण त्याकरितां एक दैनिक, राष्ट्रांतील घडामोडी संबंधीं माहिती असण्यास एकादा केसरी, यंग इंडिआ सारखें सप्ताहिक व त्याहून गहन विषयांची ओळख होण्यासाठीं मॉडर्न रिव्हयू सारखें भारदस्त असें एकादे मासिक इतपत वाचन पुष्कळ झालें. अनेक पत्रांचे वाचन एकाद्या संपादकास वा राजकारणी पुरुषांस जरूरीचें असेल. इतरांस तें बिलकूल अवश्य नाहीं.

**महाराष्ट्र स्त्रीसमाजः**-कांहीं महिन्यांपूर्वी प्रो. केसकरांना स्त्री समाजाच्या आवश्यकते विषयीं 'समाजांत' विवेचन केलें होतें. त्यांच्या त्यावेळीं योजिलेल्या पंचरंगी समाजसेवेंत या विषयास त्यांनीं एक प्रमुख स्थान दिलें होतें. परंतु पुढें ते येथून गेले व ही एक कल्पनाच राहिली. आपल्याला स्त्रीसमाजापासून काय फायदे आहेत हें आपल्यापैकीं बहुतेकांस अनुभवास आल्या नंतर स्त्रीवर्गा करितांही तशी योजना अमलांत आणण्यांत दिरंगाई करणें यापुढें उपयोगी नाहीं. जागा वेळ वगैरे बाबी गौण आहेत आठवड्यांतून प्रथमतः एक दिवस दुपारचे वेळीं एकादा तास जमावयाचें भगिनी वर्गानें मनांत आणल्यास महाराष्ट्र समाजाची जागा तेवढयापुरती देण्यास चिटणीस नाहीं म्हणणार नाहींत असें आम्हांस वाटतें. स्त्रीसमाज एकदां संघटित झाल्यास स्वदेशी, चहा कॉफी पान त्याग, स्पर्शास्पर्शाचे निर्बंध शिथिल करणें, परस्पर प्रेम संवर्धन वगैरे अनेक दृष्टीनें व पुरुष वर्गांत त्यापेक्षांही सुलभ रीतिनें यशस्वी प्रयत्न करतां येतील या दिशेनें लौकर सुरवातहोवो असें आम्ही इच्छितों.

**नृसिंह जयंतिः**-अति श्रेष्ठ पुरुषांत आपण कांहींची जयंती व कांहींची पुण्यतिथि करतों. त्यांतल्या अत्यंत दिव्य व अद्वितीय अशा व्यक्तींची जयंति व " यद् यद् विभूति मत्सत्त्वम " अशा बाकी सर्व विभूतींची पुण्यातिथि करण्यांत येते. जयंति हा शब्दच त्यांतील अर्थ सुचवीत आहे. ज्या पुरुषांनीं काळाला आव्हान करून त्यावर जय मिळविला त्यांचीच जयंति करणें योग्य. आज राम कृष्ण वगैरे अवतार झाल्याला दोन तीन हजार वर्षे लोटली तरी त्यांची चरित्रें व पुण्यस्मरण काळाला विस्मृतींत गडप कां करतां आलीं नाहींत. इतर कित्येक श्रेष्ठ पुरुष दाखवून देतां येतील कीं जे आज विस्मृतीमुळें कोणासही ठाऊक नाहींत.

जगास प्रकाश करून मार्ग दाखविणे हा अवतारांचा हेतु होय व तो अवतार भगवद्वचनाप्रमाणे धर्मग्लानि व अधर्माभ्युत्थान झाले असतां साधुपरित्राण व दुष्कृतविनाश व धर्मसंस्थापनेसाठीं होत असतो. नृसिंहावताराकडे या दृष्टीनें पाहिले म्हणजे त्याकाळीं त्यानें फारच आवश्यक असे कार्य केले असले पाहिजे असे दिसते. आजची आपली स्थिति त्या काळापेक्षा भिन्न नाहीं. पंचमहाभूतावर सत्ता गाजविणारे पाश्चात्य लोक आज येथे राज्य करीत आहेत व तीन लक्ष लोक आपल्या तीस कोट हिंदवासीयांस मेंढराप्रमाणे ताब्यात ठेवीत आहेत. या पेक्षां घोरतर स्थिति ती आणखी कोणती? प्रतिवर्षी कोट्यावधि रुपये येथून परदेशांत जात आहेत, एक तृतीयांश प्रजा अर्धपोटी राहून गुजारा करीत आहे, खेडीं ओस पडत आहेत, महर्गता वाढत चालली आहे गुराढोरांची कत्तल होऊन शेतीस व आरोग्यास धक्का पोंचत आहे. इतर देशांत आयुर्मर्यादा वाढत आहे तर आमची दर गणतीचे वेळीं खाली खालीच येत आहे. भावाभावांत, जातीजातींत, पक्षापक्षांत, मतभेदाचे नावाखालीं वैमनस्ये वाढत आहेत. अशा विलक्षण परिस्थितीत परमेश्वरास अवतार घेण्यासाठीं प्रार्थना करण्यावाचून दुसरा कोणताही उपाय दिसत नाहीं. आज खरोखर नृसिंहाचीच अत्यंत आवश्यकता आहे. प्रत्येकांत ईश्वरी अंश असल्याकारणाने त्या नृसिंहाचे गुण आपणांपैकी प्रत्येकानें आपल्या अंगांत आणण्याची धमक बाळगली पाहिजे. मनाचा व शरीराचा मवाळपणा टाकून देऊन त्याचे जागीं टणकपणा आण-

ण्याची आतां आवश्यकता आहे निर्भयता व शक्ति हीं आंगीं आल्यास परमेश्वरालाही अवतार घेणें भागच पडेल.

बावळा प्रकरणाची नुकतीच समाप्ति होऊन इंदूरचे महाराज स्वेच्छेने (!) गादी सोडून चालते झाले. निजामशाहींत पूर्वी प्रमाणे हिंदूस राहणे असह्य होत चालले आहे. पतियाळाच्या महाराजांचा विलायत व इतर प्रांतात जनतेपासून उकळलेला पैसा पाण्या सारखा खर्च होत आहे, गायकवाडांची वयोमानाप्रमाणें बुद्धि नाठी होऊन ते विलायतेसच आपली जन्मभूमि समजत आहेत. तात्पर्य एक ना दोन दरएक संस्थानांत तेथील राजाच्या कांहींना कांहीं तरी लीला चालूच आहेत. या संबधांत एका सन्मान्य मित्राने संस्थानि कांची पूर्व पीठिका सांगितली तीच खरी वाटूं लागते. ती गोष्ट अशी. देवदानवांच्या पुराण काळच्या घनघोर युद्धांत दानवांस पराजित कसे करावे या विवंचनेत देव पडले होते. इन्द्र, विष्णु, ब्रह्मा, महेश सर्व थकले शेवटी सर्व या पृथ्वीवर आले व वाघ सिंह इत्यादिकास त्यांनी सहाय्यासाठी विनंति केली परंतु देवादिकांची जेथे डाळ शिजली नाहीं तेथे आम्ही गरीब श्वापदे तीं काय करणार म्हणून त्यांनीं माघार घेतली; मनुष्यानेही तेच सांगितले. इतक्यांत एक गर्दभराज समोरून येते झाले. त्यांस विनंति करतांच त्यांनी तत्काळ आपल्या ८०० बांधवांसह मदतीस येण्याचे मान्य केले. झालें ! दुसरे दिवशींच गर्दभ-

राजांनी दानवांचे टोळीवर आपली फौज चौखूर प्रचंड गर्जनेंत सोडली त्यासरशी दानवांची त्रेधा होऊन देवांस जय मिळाला नंतर विजयोत्साहाचा एक दरबार इंद्राच्या प्रमुखत्वाखाली भरला त्यांत गर्दभराजांस त्यांच्या अतुल कामगिरीसाठीं एक वर मागण्यासाठीं त्यांनी सांगितले. परंतु " आपण द्याल त्यांत आम्ही खूष आहों. आपणांस मदत करणे आमचे कर्तव्यच होते त्यांत आम्हीं काय मोठे केले ? " असे गर्दभराजांनी उत्तर दिले. तथापि कांहीं तरी मान द्यावा अशी देवांची इच्छा असल्याने इंद्राने त्यास पुढील प्रमाणे वर दिला, " मित्रहो आज आम्ही आपल्या कामगिरीने उपकारबद्ध असल्याने फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून तुम्हांस एक वर देतों. गर्दभराज, तुम्ही व तुमची ८०० जणांची टोळी आतां त्या अवनीतलावर जा. तुम्हा दरेकांस एक एक संस्थान हिंदुस्थान देशात वंशपरंपरेने दिले आहे तेथे जाऊन राज्य करा " भाषणानंतर मोठा शंखध्वनि झाला व तेव्हांपासून ही मंडळी संस्थानिक झाली. त्यांचेच वंशज आज राज्य करीत आहेत.

## उन्हाळ्याची सुट्टी.

सुट्टी म्हटली आणि ती सुद्धां परीक्षेच्या जाचानंतर म्हणजे विद्यार्थ्यांस काय आनंद होतो हे जे विद्यार्थी आहेत त्यांना अनुभवानें व जे त्यांतून पार पडलेले आहेत त्यांना आठवणीनें पूर्ण माहीत

आहे. यावेळीं सुटींत आपण मजा करावी येवढीच बहुतेकांची इच्छा असते. पण, अनुभव असा येतो कीं ज्या गोष्टींस ते मजा या नावाने कल्पितात त्यांत मजा तर नाहींच पण उलट नुकसानच आहे. मजेची विद्यार्थ्यांची पहिली समजूत म्हणजे अनियमितपणा. सकाळीं ७–८ वाजेपर्यंत आळसानें लोळत रहावें, दोनतीनदा नरड्यांत चहा ओतावा, घरच्या मंडळींनीं सांगितलेली कामें मोठ्या असंतोषानें करावी, दुपारी जेवल्यावर २–३ तास वामकुक्षी घ्यावी, पुढें २–३ तास गप्पा व पत्ते झोडावे, पुन्हां चहा ढोसून चार पांच समानशील सहाध्यायाबरोबर थोडे नाजुकसे फिरावयास जावे व तेथेच सर्वांनीं रात्रीं नाटकास जाण्याचा बेत करावा, घरी परत येऊन जेवण करून नाटकास खुर्चीची तिकीटे काढून जावे, तेथे किमानपक्ष सोडा लेमन आइस्क्रीम इत्यादि जिनसा विकत घ्याव्यात व रात्रीं अर्थातच २–३ वाजता नाटक संपल्यावर परत यावे हा विद्यार्थ्यांच्या दृष्टीने सुटींतील चांगल्या गेलेल्या दिवसाचा कार्यक्रम समजण्यात येतो. अभ्यासाचीं पुस्तके सुटीत न उघडणे हा तर विद्यार्थ्यांचा जन्मसिद्ध हक्कच असतो, मग तिकडे कोणी ढुंकूनही पाहत नाहीं हे कशास सांगावयास पाहिजे? तात्पर्य या सुटीचा उपयोग जा विद्यार्थ्यांस पुन्हां ताजें तवानें करून हुरूप आणण्याचा तो बिलकूल साध्य न होतां उलट नियमितता, टापटीप, व्यवस्थितपणा व आरोग्य या सर्व दृष्टींनें सुटीनंतर विद्यार्थी बिघडला आहे असेंच आढळून येतें. यासाठीं आपली मजेची व्याख्या गैदीपणा अशी न करितां व्यवसाय उद्योग

व अभ्यास यांचा दिशाबदल एवढाच करावा. “ रिकामें मन सैतानाचें वसतिस्थान ” ही, म्हण ध्यानांत ठेवून सतत आपल्या मनासशरीरास कसली तरी गुंतवून ठेवील अशी कोणत्याही—अर्थात् उपयुक्त—विषयाची गोडी स्वतस लावून घ्यावी. आपण हे अवश्य ध्मानांत ठेवले पाहिजे कीं सध्यांची आपली दशा ही रोज काहीं तरी मिळवीत राहणेची आहे. व्यापारांत भांडवल तसे या जगात अनेक विषयांचे ज्ञान व चांगल्या संवयी आपणांस अवश्य आहेत. यासाठीं दर सुटींत दर विद्यार्थ्याने पुढीलप्रमाणे करण्याचा निश्चय करावाः—

एका नवीन कलेंत प्रवेश करून घेणे. उदाहरणार्थ गायन पायगाडी चालविणे, पोहणें, लाठी इत्यादि.

एक वाईट संवय सोडुन देणेः—उदाहरणार्थ, उशीरा उठणे, चहा, चवणेपणा इत्यादि.

एक महत्त्वाचा ग्रंथ वाचणेः—उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरी, दासबोध, गीतारहस्य इत्यादि.

प्रतिदिन एक श्लोक तरी पाठ करणेंः—आपली पाठांतरशक्ति दिवसेंदिवस अजिबात नाहींशी होत चालली आहे. ती अत्यंत उपयुक्त असल्याने तिचे पुनरुज्जीवन करणे प्राप्त आहे.

स्वावलंबनाची एक संवय लावून घेणेंः—उदाहरणार्थ स्वतः चें रोज धोतर इत्यादि कपडे धुणें, स्वतःची खोली स्वच्छ ( झाडून सारवून ) करणें, गार पाण्याच्या स्नानास आरंभ करणें.

हावरा माणूस जसा मला हें पाहिजे तेहीं पाहिजे अशी इच्छा करितो तसें वरील पैकी शक्य तितक्या अधिक गोष्टी विद्यार्थ्यांनीं प्रत्येक सुटीत अमलांत आणून पहाव्या. तसे झाल्यास सुट्टीनंतर आपणांत कितीतरी सुधारणा झाली आपण किती तरी उपयुक्तता वाढविली निदान आपलें परावलंबित्व कितीतरी कमी झालें असें आपणांस आढळून येईल. या खेरीज आपल्या लहान भावंडास शिकविणें, आपली आई बहीण इत्यादी साक्षर नसल्यास त्यांस जगांतील हालचालींची माहिती देणें (अर्थात् त्याचे आधीं आपणां स्वतःस ती माहिती पाहिजे) आपल्या खेडेगांवी गेल्यास साक्षरता—प्रसाराचा उद्योग करून पाहणें, लग्नमुंजी वगैरे कार्यांत व्यवस्था हल्लीं ठेवतात कशी, ती वाढवितां कशी येईल व नेहमी चुका होतात कोणत्या याचें टिपण ठेवणें, खऱ्या चाळवीरा प्रमाणें प्रतिदिन परोपकाराचे. लहान कां होईना, एकादें तरी कृत्य करणें, विदेशी जिनसेचा—उदाहरणार्थ कापड साखर—आपण स्वतः त्याग करून दुसऱ्याकडून करविणें व अशा रीतिने देशप्रीतिचें सक्रिय बीज रुजविणे, बाजारहाट करून व्यवहार दक्षता मिळविणें इत्यादि अनेक गोष्टींचा उल्लेख करितां येईल. परीक्षेच्या पुस्तकाच्या अध्ययनापेक्षां वराल गोष्टींची आवश्यकता व किंमत कितीतरी अधिक आहे ती जाणण्याची, समजण्याची व उमजण्याची बुद्धि व शक्ति आम्हांस द्यावी अशी त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना आहे.

---

# क्रॉम्वेल, नेपोलियन व बॅ. सावरकर.

( ल. श्री. वि. मा. देशपांडे. )

क्रॉम्वेल, नेपोलियन व बॅ. सावरकर हे तीन महावीर देशपरिस्थितीनुसार आपआपल्या देशांत स्वातंत्र्यप्राप्तिकरितां उदयास आले. इंग्लंडांत सन १६४२ सालीं क्रॉम्वेल, नेपोलियन सन १८०० त फ्रान्समध्ये आणि बॅ. सावरकर नेपोलियननंतर बरोबर नऊ तपांनीं हिंदुस्थानांत दिपूं लागले. तिघाचाही हेतु एकच आणि, तो म्हणजे स्वातंत्र्यप्राप्ति. तिघानांही आपले देशांतील लोक पारतंत्र्याखालीं पिळले जाऊं नयेत असे वाटे. त्या त्या देशांतील लोक जुलमानें पिळले जाण्याची कारणें जरी निरानिराळी होतीं तरी तो जुलूम निवारण्याचा मार्ग मात्र एकच होता असे वाटते.

क्रॉम्वेल्च्या वेळीं सर्व जनता आणि त्यांचा राजा १ ला चार्ल्स यामध्यें फारच कलह माजला होता. या कलहाला चार्ल्स हा एकटाच कारणीभूत झाला नव्हता. कारण ह्याचे अगोदर कलहाची आग साधारणतः पेटलेलीच होती. 'राजांनीं गादीवर बसणें हा ईश्वरी हक्क ( डिव्हाइन् राइट ऑफ किंग्स् ) इंग्रजीत ज्याला म्हणतात, ते तत्व पहिल्या जेम्स्‌ने लोकांच्या दृष्टीसमोर आणले. हे तत्व लोकांना अर्थात् नापसंत पडलें. परंतु जेम्स्‌चा मुलगा जो पहिला चार्ल्स् त्याला कांहीं नापसंत पडले नाही. त्यानें ह्या तत्वाचा पुरस्कार केला. ह्या राजेलोकांची इच्छा हीच कीं आपण स्वेच्छेने राज्यशकट

हाकावा परंतु प्रजा ही इच्छा कांही चालू देइना. आपल्या इच्छातृप्ती करितां राजेलोक लोकप्रतिनिधिक सभा (पार्लमेंट) बोलावीत नसत. होईल तितकें त्या सभेला न बोलावितां शक्य तें काम करून टाकीत. परंतु राजाला जेवावयाला घालावयाचे की नाही, राजाला पोटगी किती द्यावयाची इत्यादि गोष्टी ठरविण्याचा हक्क त्या लोकप्रातिनिधिक सभेला होता. तेव्हां ज्यावेळीं राजा सभेला बोलावीना त्यावेळीं लोक राजाला पैसे देइनासे झाले. व ह्या पैशाचे बाबतीतच राजा व प्रजा या मध्ये नेहेमी खडाजंगी उडे. कारण लोकप्रतिनिधिक सभा राजाला ताळ्यावर आणण्याकरितां 'काही अटी त्याच्या पुढें आणीत असे व म्हणत असे की "ह्या अटी प्रमाणें वागेन असे वचन दे व अटी लिहिलेल्या कागदावर स्वाक्षरी कर. स्वाक्षरी नाहीं केली तर पैसे काही मिळणार नाहींत." 'गादीवर बसणे हा ईश्वरी हक्क' मानणाऱ्या पहिल्या चार्लस्ला हे म्हणणे कसें आवडणार? अर्थातच पैसे नाहीं मिळाले म्हणजे कोणास कांहीं पदवीदान इत्यादि अन्य उपायांनी तो पैसे मिळवी. त्यानें 'शिप्मनी' नांवाचा एक कर समुद्रालगतच्या मुलखावर बसविला. अशा कृत्याने तर त्याच्यावर सर्व प्रजा संतापून गेली. लोकप्रातिनिधिक सभेने तर राजाच्या दुष्कृत्यांची एक नामावलीच सिद्ध करुन ती राजाकडे पाठविली व तीच छापून गल्लोगल्लीं जाहिराती प्रमाणे वाटली. अशा रीतिने तिकडे राजाचा जोर व इकडे प्रजेचा जोर. या रज्जुयुद्धांत (टग ऑफ वॉर) राजाचे आणि प्रजेचे स्नेहबुद्धिचे नाते तुटले. ह्या जोराजोरीत

पहिल्या चार्ल्स्‌ला जग कायमचें सोडावे लागले. जो राजा गादीवर बसण्याचा ईश्वरी हक्क आहे असे समजतो त्याला असे प्रायश्चित मिळते हे क्रॉम्‌वेलने स्वतःच्या कृतीने सर्व जगास दाखविले.

अशा रीतिने पहिल्या चार्ल्स्‌ला तिलांजलि दिल्यावर क्रॉम्‌वेलने, त्याच्याकडे जरी राज्यपद आले तरी ते नाकारले. नंतर लोकानी त्याला ' राज्याचे रक्षण कर्ते ' अशी पदवी दिली. अशा तऱ्हेनें क्रॉमवेलने एकंदर सहा वर्षे राज्यकर्ता या दृष्टीने राज्य करून लोकसत्ताक राज्याची टुमदार इमारत लोकांस बांधून दिली. इंग्लंडला समुद्राधिपती बनविले. डच लोकांचा पुरा मोड करून, देशाला उन्नतावस्तेस योग्य असे निरनिराळे निर्बंध पसार केले. तात्पर्य इंग्लडचे कीर्तिवैभव अत्युच्च शिखरी नेण्याचा प्रयत्न केला. त्याच्या राज्यव्यवस्थेत वैगुण्य असेल तर ते एकच. आणि ते म्हणजे त्याचा लष्करी शिस्त व कडकपणा. इंग्लंडचा तो अभिमानी खरा, इंग्लंडचा तो प्रेमी खरा, इंग्लंडविषयीं त्याची अत्युच्च भावना खरी परंतु स्वतः अतिशय कडक हा त्याचा मुख्य दोष. ह्या दोषाला कंटाळूनच एकानें 'ठार मारल्यास खून होणार नाहीं ( किलिंग नो मरडर ) ह्या नावांचे पुस्तक लिहिलें व त्यांत ' क्रॉम्‌वेलचा मृत्यु देशाला हितावह आहे ' असे जोराने प्रतिपादन केले हे पुस्तक क्रॉम्‌वेलचे हाती पडल्यावर त्याला काय वाटले असेल ? इंग्रज लोकांनीं त्याला त्याच्या कामगिरी प्रमाणें उत्तम बक्षीस दिले नाही एवढे खरे. त्याच

प्रमाणे लोकसत्तेची किंमत सुद्धां इंग्लंडला कळली नाही असे म्हणावें लागते, कारण क्रॉम्वेलनंतर दुसरा जेम्स् हा गादीवर बसलाच.

इंग्लंडप्रमाणेच फ्रान्स देशांतील लोकसुद्धां जुलमी राजसत्तेला अगदीं कंटाळून गेले होते व शतक दीड शतक कराच्या बोजानें टेकीस आले होते. विशेष असे कीं श्रीमंत आणि धर्माधिकारी वर्ग कर देण्याचे बाबतींत कायमचा वगळला जाई व व्यापारी, मध्यम आणि गरीब ह्या वर्गावरच सरकारांत कर भरण्याची पाळी येई. सर्व राजांना स्वतंत्रतेने राज्य करण्याची मोठी हांव. फ्रान्सचे राजे स्वतंत्र रीतिनें राज्य करूं लागले व शतके दोन शतके लोक प्रातिनिधिक सभा बोलाविल्या नाहींत. पैशाचे साह्य लागलें तर सरदार व धर्माधिकारी वर्ग सिद्ध होताच. ह्यामुळे ह्या वर्गावर राजांची मर्जी प्रसन्न असे. सरकारांतल्या बढतीच्या जागा, तसेंच लष्करांतील इत्यादि सर्व मानाच्या जागा ह्या वर्गाकडेच जात. त्यामुळे दुसरा वर्ग तर अगदींच उपाशी मरूं लागला धर्माधिकारी वर्ग आपले काम करीनासा झाला. व त्याला धर्माविषयीं निष्काळजीपणा आणि बाजीरावी राहणे आवडूं लागले. हे त्यांचे वर्तन पाहून लोकांचा क्रोधाग्नि प्रज्वलित झाला. त्याखेरीज ह्या अग्नींत व्हॉल्टेअर, रूसो ह्यांच्या सारख्यांच्या स्वातंत्र्यप्रिय विचारसरणीच्या लेखांनीं तूप पडले.

या फ्रान्स राष्ट्राच्या आगींत नेपोलियन बोनापार्टने लोकांना फारच दयेनें वागविले आणि लष्करांतील प्रत्येक सैनिकाला भावा

प्रमाणे वागविले. ह्यामुळें इंग्लंड प्रमाणे येथे सुद्धां राजाला पदच्युत केल्यावर लोकांनीं लोकसत्ताक राज्य स्थापून नेपोलियन बोनापार्टला लोकसत्ताक राज्याच्या अध्यक्षपदाचा पहिला मान सन १७९९ साली दिला. त्यानें स्वतःचे तरवारीचे जोरावर आस्ट्रीया इटली इत्यादि देश जिंकून घेतले आणि त्याच वेळी पारतंत्र्यांत व राजसत्तेच्या जुलुमाखालीं पिळून जाणाऱ्यानां आम्ही वाटेल ते साह्य करण्यास सिद्ध आहोंत असे प्रसिद्ध केले. राजसत्तेला व पारतंत्र्याला मूठमाती देणारें प्रसिद्धि-पत्रक प्रसिद्ध झाल्यावर राजेलोकांना व राजकर्त्यानां हे पत्रक फारच झोंबले व त्यामुळेच युरोपांतील सर्व राजे एका बाजुला व दुसऱ्या बाजूला लोकसत्ताक राज्य करणारे व त्याची ग्वाही फिरविणारे नेपोलियना सारखे स्वातंत्र्यप्रिय वीर. सबंध जग उलटलें तथापि हा स्वातंत्र्यप्रिय वीर एक केंसभर सुद्धां ढळला नाहीं किंवा डगमगून गेला नाहीं. जग-मान्य अलौकिक शूर सेनापति खरा पण १८०५ च्या ट्राफलगारच्या समुद्रयुद्धांत जी हारखावी लागली त्यामुळें तो समुद्रयुद्धांत कायमचा निराश झाला. ह्या पराभवाने फ्रान्सचे मोठें आरमार नष्ट झाले. नेपोलि-यनासमोर रणभूमीवरं लढण्याची एकाही राष्ट्राची छाती नव्हती. एवढा मोठा रशिया पण नेपोलियन येत आहे असें समजतांच तेथील राजा आपली राजधानी मास्को ही सोडून चालता झाला व फ्रेंच लोकांस कांही मिळूं नये म्हणून शहरभर आगी लावल्या. ह्या रशिया वर झालेल्या स्वारींत नेपोलियनचे फारच नुकसान झाले त्याचे शूर सैनिक भुकेने व्याकुळ होऊन थंडीने खुडखडत मेले.

## सिंहनाद.

दाही दिशा भक्षण्या करितां सिद्ध झाल्यावर रणवीर पळणार कोठें? आकाशच फाटल्यावर मनुष्य ठिगळें तरी किती लावूं शकणार? जगद्विख्यात पहिलवानावर देशांतील सर्व पहिलवान तुटून पडल्यावर तो पहिलवान तरी किती लढणार? सबंध युरोपखंड उलटल्यावर तो जगप्रसिद्ध योद्धा नेपोलियन किती आटोकाट प्रयत्न करणार? इतक्या भयंकर स्थितींत नशीब सुद्धां चांगले नाहीं! कर्ण एवढा धनुर्धारी परंतु अंतीं नशिबाने त्याला गोता दिला;नेपोलियन एवढाजगद्विख्यात योद्धा खरा परंतु त्याला नशीब आडवे आले! व सन १८१४ साली तो पकडला गेला. दोस्त राष्ट्रांनीं त्याला पकडून एल्बा बेटांत कैदी म्हणून ठेविले. त्याच्या सुदैवाने पुन्हां जोर केला व तो त्या बेटांतून पळाला. व ढगामध्यें अस्त झालेल्या सूर्याप्रमाणे अल्प काळांतच बाहेर येऊन हा स्वातंत्र्यवीर पुन्हां फ्रान्सच्या रणभूमीवर चमकूं लागला. फ्रान्सच्या प्रत्येक सैनिकावर त्याचा इतका विश्वास होता कीं पकडण्या करितां आलेल्या सेनापतीकेड नेपोलियन स्वतः थोडी मंडळी घेऊन आला. कर्नलने ह्या नरश्रेष्ठावर गोळी झाडण्यास आज्ञा केली परतुं त्याला पहातांच सर्वांच्या बदुंका खांद्यावरच राहिल्या; पुन्हा पकडण्याची आज्ञा केली तेव्हां मात्र सैनिकांच्या हृदयांत वसत असणाऱ्या देवाने, प्रजावात्सल्याच्या मूर्तिमंत पुतळ्यानें, त्या फ्रान्सच्या योद्धयाने, सिंहनाद केला व म्हणाला, ' तुम्हांला जर पकडणें असेल तर तुमच्या पुढें मी आहे. परंतु कार्य करण्याचे अगोदर माझी ओळख ठेवून मग कार्य करा. ' हे वाक्य कानीं पडतांच सर्व सैन्य बिथरले

त्यांनीं नेपोलियनाच्या नांवाचा जयजयकार केला. स्वातंत्र्यप्राप्ती करितां पुढें सरसावलेल्या वीरांना चिरकाल सौख्य लाभत नाहीं;त्याच्या सुदैवाने शंभर दिवस दम धरला व शेवटीं ह्या वीरश्रेष्ठाला वॅटर्लूचे लढाईत कच खावी लागली. कैदी म्हणून त्यास सेंट हेलिना बेटांत पाठविण्यांत आले व त्यावेळेपासून तो आपल्या जन्मभूमीस कायमचा अंतरला आणि त्या स्वातंत्र्यप्रिय वीराचा यःकश्चित् कैदखान्यांत अंत झाला. फ्रान्सच्या बादशहाचा मृत्यु तुरुगांत व्हावा याला म्हणतात दैवी विचित्रा गतिः !

वरील दोन स्वातंत्र्यप्रिय वीरांच्या चारित्रापुढें बॅ. विनायकराव सावरकर याचें चरित्र अगदीं अल्प आहे. परंतु तेंच मातृभूमिच्या कळकळीनें आणि वीरश्रीने ओतप्रोत भरलेले आहे. सन १९०२ ते १९०६ च्या ऐन स्वातंत्र्याच्या चळवळीला हातभार लावण्याकरितां ह्या वीर पुढे सरसावला. ह्या वीरानें आपल्या विद्यार्थी दशेतंच ऐवढी भयंकर जागृति करण्याचा यत्न केला कीं, त्याचा परिणाम विद्यालयांतून अर्धचंद्र मिळण्यांत झाला व परीक्षेला बसूं देईनात. पुण्याच्या सर्व वर्तमानपत्रांनी विद्यालयाच्या मुख्य अध्यापकावर चांगलेच कोरडे ओढले. केसरीनें ( लो. टिळकानी ) तर 'हे आमचे गुरुच नव्हत' असा अग्रलेख लिहिला. ह्या सर्वांच्या प्रयत्नानें बॅ. विनायकराव बी. ए. च्या परीक्षेस बसले व उत्तर-पात्रिका ( पेपर्स ) तपासण्यांत देशभक्ति आड न आल्याकारणानें ते उत्तीर्णही झाले.

त्यावेळीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची चळवळ करण्याचा सम्य-मार्ग म्हणजे इंग्लंडांत जाऊन चळवळ करणें हा होता. व त्यामुळेंच दे-शांतील नांवाजलेले पुढारी इंग्लंडला चळवळ करण्याकरितां गेलेले होते. अर्थात्च तशी खळबळ करिण्याकरितां म्हणून, मोठमोठ्या मंडळीचा सल्ला घेण्याकरितां म्हणून आणि बॅरिस्टरीचा अभ्यास करण्या करितां म्हणून ते विलायतेस गेले. ह्याच सुमारास इंग्लंडास क्रांतिकार कांची चळवळ फार जोराने चालली होती. इंग्रजी टाईम्स इत्यादि भारदस्त पत्रें २३।२४ वर्षांच्या तरुणाचा खरपूस समाचार घेऊं लागलीं आणि पकडण्याचा धाक दाखवूं लागलीं. परंतु हा पंचवीस वर्षांचा तरुण, मायभूमीची फिर्याद चालविण्याकरितां गेलेला बॅरिस्टर ह्या धमक्यांना थोडाच जुमानणार? पण मित्रमंडळीचा फारच आग्रह पडल्यावरून तुरूंगवास टाळण्याकरितां तो वीर खिन्न होऊन फ्रान्सला गेला. आणि फ्रान्स मधून बसल्या बसल्या आपली चळवळ चालू केली. परंतु जेव्हां पकडापकडीची आग इंग्लंडांत पेटली तेव्हां मात्र आपल्या लोकाकरितां तिळतिळ तुटणाऱ्या तेजस्वी सावरकराला फ्रान्सला राहणें बिलकूल आवडेना. व कोणाचेंही न एकतां विनदिक्कत या आगींत उडी घेण्याकरितां इंग्लडला आला. आगींत सांपडल्यावर मग काय? मायभूमीच्या स्वातंत्र्यार्थ सशस्त्र चळवळ करण्याच्या देहान्तदण्डीय आरोपावरून १९१० च्या मार्च महिन्यांत २६ वर्षांचा भारतमातेचा छोकरा पकडण्यांत आला. तावडतोब त्यानां हिंदुस्थानांत आपण्याचें ठरलें व त्याप्रमाणें बोटी-

वर चढविलें. मातृभूमीच्या उत्कर्षार्थ उसळणाऱ्या रक्ताला, स्वातंत्र्य-प्रिय तरुणाला ही कैद कशी पत्करणार ? अशा वीरानां तुरुंगांत खिचपत पडण्यापेक्षां सर्वस्वी एकदम नष्ट झालेलें बरें वाटतें. तेजस्वी विनायकरावांनीं जीव तळहातावर घेवून बोटीवरुन भयंकर अफाट समुद्रांत उड्डाण केलें. ह्या उड्डाणाप्रमाणेंच त्यांच्या नशिबानेंसुद्धां उड्डाण केलें खरें परंतु दुर्दैवाने गाठले. पुन्हां त्यांना पकडण्यांत येऊन, हिंदुस्थानात आणून काळे पाण्याची शिक्षा देण्यांत येऊन अंदमानात पाठविण्यात आलें. त्यामुळें हा वीर हिंदभूस मुकला ह्याबद्दल सर्वांना वाईट वाटलें.

परंतु 'कर्मणो गहना गतिः' म्हणतात ती अशी कीं तोच स्वातंत्र्यवीर काळेपाण्यालासुद्धां तोंड देऊन, बॅरिष्टरीच्या वाक्चातुर्यानें प्रत्यक्ष यमाला भुलवून, मातृभूमीची सेवा करण्याकरितां पुन्हां आपल्यांत आला. हा परिणाम केवळ मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी लागलेल्या तळमळीचा होय.

आतांपर्यंतच्या तीन वीरपुरुषांच्या चरित्रांत त्या त्या देशाची परिस्थिती आलेली आहे. क्रॉम्वेलचे वेळीं सर्व प्रजा एका बाजूला व राजा एका बाजूला अशी परिस्थिती होती. फ्रान्समध्ये गरीब व मध्यम वर्गाच्या लोकांच्या विरुद्ध सर्व सरदार आणि राजा, आणि हिंदुस्थानांत तर सर्वच निराळें. चळवळ,राजकर्त्यांच्या विरुद्ध खरी, पण लोक अजाण. ज्याप्रमाणें इंग्लंड व फ्रान्समधील लोक तन–मन–धनानें गांजले

होते त्याची त्यांना जाणीव झालेली होती, त्याप्रमाणे आमच्या हिंदुस्थानांत लोक जरी तन–मन–धनानें गांजले होते तरी त्याची जाणीव त्यांना नव्हती. अर्थात्‌च ती जाणीव उत्पन्न करून चळवळ सुरु करणें व नंतर स्वातंत्र्य मिळविणें म्हणजे स्वर्ग गांठण्याची इच्छा झाल्यावर नुसतें सूत सुद्धा नसतां तें उत्पन्न करण्यास आरंभ करण्यासारखे होय. दुसरे म्हणजे असें की वरील दोन्ही योद्धे पथकाधिपती होते. आमचा हिंदवीर पेशवाईंत निर्माण झाला असता तर पथकाधिपतीच काय पण सेनापति ही झाला असता; इतकी ज्याची योग्यता तोच मनुष्य गुलामगिरींत निपजल्या बरोबर त्या योग्यतेला जन्मठेप काळें पाणीच पहावें लागतें. गुणांचे बाबतींत तिघांची बरोबरी होईल. बॅ सावरकर हे नेपोलियन प्रमाणें लढाई जरी खेळले नसले तरी त्यांचे मनोधैर्य अशी ग्वाही देतें कीं वेळ आली तर त्यांची शक्ती कंकणभर जास्तच पण कमी दृष्टीस पडणार नाही. १८५७ साली हे जर निर्माण झाले असते तर आजचा हिंदुस्थान म्हणजे स्वातंत्र्याच्या स्वैर वातावरणांत गडबडतांना. खेळतानां दिसला असता. पण हिंदभूचें दुर्दैव असें की, बॅरिस्टरासारखीं रत्नें लक्ष्मीबाइचे वेळीं जन्मास न येतां उलट पक्षी राजे दिनकराव यासारखीं रत्नें जन्मलीं.

आपापल्या देशांतच नव्हे तर सबंध जगांत तिघांच्याही चळवळीचा परिणाम झाला. एकमेकांच्या दृष्टीने जरी फलप्राप्ति बरोबर झाली नसली तरी जगाच्या स्वातंत्र्याचे इतिहासांत ह्यांची, नांवें एकाच

शाईने लिहिलेली आपणांस आढळतील. आम्हांस वाटतें कीं तेजस्वी सावरकरांचे नाव पहिले लिहिलें जाईल. कारण क्रॉम्वेल नेपोलियन यांचे वेळीं आयती च परिस्थिती निर्माण झालेली होती. पण बॅरिस्टराना ती आपल्या मनाप्रमाणें निर्माण करणे भाग होतें. व परिस्थिती एकदम उत्पन्न करणे फार भयंकर काम आहे.

लोकमान्यांना ह्या परिस्थितीचे पायीच आपलें अर्धे आयुष्य तुरुंगाच्या दारांत काढावे लागले. चळवळीच्या यशस्वितेच्या बाबतीत फ्रान्सचा पहिला नंबर लागेल. दुसरा नंबर इंग्लंडचा व तिसरा हिंदभूचा, फ्रान्सचा पहिला नंबर लावण्याचे कारण असें की नेपोलियनचें प्रजासत्ताक राज्य आजपर्यंत चाललें आहे. फ्रान्सच्या राजांनी एकदां स्वर्ग गांठल्याबर त्यांना मृत्युलोकी परत यावस वाटले नाहीं. क्राम्वेलनें प्रजासत्ताक राज्य स्थापिलें पण तें फार वेळ टिकलें नाही. याचा अर्थच असा की त्यावेळच्या इंग्रजांना गुलामगिरीची गोडी लागली होती. आमच्या येथें तर सर्वच विपरीत. सोटेशाही बळावून त्याचे तडाखे सर्वावर सारखे बसूं लागले. साध्यतेच्या बाबतींत तर हिंदुस्थान पहिला, नंतर फ्रान्स दुसरा व तिसरा इंग्लंड. कारण सोटेशाही माजली असताना सुद्धा चळवळ कायम ठेवून सोटे खात खात कां होईना आमच्या राजकैद्यानां सोडविलें, हें काय कमी झालें ? आपल्या घरांत आपल्या सुखाच्या सोई कोणीही करून घेईल. पण घराच्या हक्काकरितां भांडणें चालली असतांना टोले खात आणि टोले देत गळा

धरून आमचे स्वातंत्र्यवीर हिसकावून घेणें ही केवढी कमालीची गोष्ट आहे !

ह्यापेक्षां आणखी ज्यास्त साध्यता कसली पाहिजे ? फ्रान्सचें कायमचें साधलें. परंतु त्यांचेच सर्व असल्यावर अवघड कसलें ? इंग्लंडने साधलें पण कायम टिकण्या करितां नव्हतें ! त्यांना ही फक्त आवडली नाहीं म्हणून नामधारी कां होईना अद्याप राजा राज्य करीत आहे.

आतां शेवटची कामागिरी म्हणाल तर तजस्वी सावरकरांचीच वाखाणण्या सारखी आहे. याचा अर्थ दुसऱ्यांची फुकट असा मात्र नाहीं. वेळ आल्यावर कोणीही कोणतीही गोष्ट करून दाखवील, पण तशी वेळ स्वतः आणवून कामगिरी बिनमोल करून दाखविणें विशेष होय. आतां राहिला शेवट. तो मोठा विचार करण्या लायक आहे. कारण एवढा मोठा नेपोलियन कीं ज्याची कामागिरी सर्व जगाला पसंत पडली त्याचा शेवट, काय तुरुंगांत व्हावा ? प्रजा सत्ताक राज्याचा धडा घालून देणारा क्रॉम्वेल त्याने, 'मारल्यानें खून होणार नाहीं हें, पुस्तक वाचीत दुःख करीत मरावें काय ? मातृभूमीच्या स्वातंत्र्याची इच्छा करून चळवळ करणाऱ्यास देहान्तदण्डनीय शिक्षा व्हावी काय ? ( सुदैवानें बॅ सावरकर कैदमुक्त होऊन परत भरतभूसेवेस लागले ही आनंदाची गोष्ट आहे; ) हा विचार केला म्हणजे ' कर्मणो गहना गतिः ' असें म्हणून मन विचारमग्न होतें.

ऑक्टोबर १९२४.

# 'ऐक्याचें उभवा शीड'

(कवि–यशोदातनय.)

एकांती असुनी जेव्हां । करि विचार भोक्तृत्वाचा
हृदयाचें होउनि पाणी । कुंठली हाय ती वाचा
दास्याची बेडी पायीं । परि विचार नाहीं त्याचा

सिंहाचे असुनी छावे
गिरिगव्हरि दडुनी जावे
शेळीला मग कां भ्यावें

कांहींच कळेना गूढ । ऐक्याचें उभवा शीड ॥ १ ॥

सरितेचें निर्मळ पाणी । सागरासि जाउनि मिळतें
गुणधर्म विसरुनी अपुले । एकरूप होउनि जातें
उच्च नीच जेथें नाहीं । भेदभाव कैंचा तेथें

निर्जीव जगाची रीत
आदर्श सजीवा होत
आल्हाद मनाला देत

अपसांतिल विसरुनि तेढ । ऐक्याचें उभवा शीड ॥ २ ॥

मुस्लीम हिंदु वा जैन । राष्ट्राचे केवळ प्राण
एकीने करितिल कार्य । दृष्टीचा बदलुनि कोन
होतील हजारों भारी । जातीनें जरि ते भिन्न

वृक्षाच्या शाखा जैशा
धर्मांच्या याती तैशा
कलहानें पावति नाशा
नाहीं कां याची चाड ? ऐक्याचे उभवा शीड ॥३॥
अपसांतिल वैराग्नीचा । माजला किती डोंबाळा
देशाला लागे हाय ! पेटूनि भयंकर ज्वाळा
एकीचें शिंपुनि पाणी । वालील कोण त्या आळा ?
याविणें दुजें तें कांहीं
चित्तांस सुचेना पाही
नयनांना दिसतहि नाहीं
लागलें एकची वेड । ऐक्याचें उभवा शीड ॥४॥
चिंतनीं मायभूमीच्या । रंगुनी निरंतर जावें
तत्कार्यी झिजवुनि काया । बहुमोल आयु वेचावें
स्वाभिमान धरुनि चित्तीं । देशाचे सेवक व्हावे
मागेल जरी तो काळ
प्राणाचें द्यावें मोल
दावावें करुनी लोल
धैर्याची दाउनी जोड । ऐक्याचें उभवा शीड ॥५॥

# मौजच मौज.

ले. चंद्रकान्त ग. कर्णिक वडोदे.

काय ह्मणतातना 'नाव सोनुबाई पण हाती कथलाचा वाळा' तशातलाच प्रकार. नांव विद्या-धर पण प्रकार पाहिलात तर निव्वळ विद्यासोडपणाचा. विद्याधर हें नांव बरेंच लांबरुंद ऐसपैस असल्यानें आम्ही त्यांना विदोबा ह्मणण्याचा सर्रास प्रघात ठेविला होता. विदोबांची आणि माझी लहानपणापासून अगदी दिलदार दोस्ती. गळ्यात गळा घालून हिंडलों. हातांत हात घालून खेळलों. इतकेंच काय पण पायांत पाय घालून एकमेकांना तोंडघशी देखील पाडिलें. मग मैत्री नसायला काय झालें. आणि पुन्हा मैत्री पण अशी तशी नाही, अगदीं इरसाल गट्टी. या गट्टींत कधी कधी कट्टीची कारस्थानें होत असत परंतु ती तितक्यास तेव्हढींच, बाकी एव्हीं विदोबा वांचून आह्मी आणि आमच्या वांचून विदोबा ह्मणजे डोक्यांत राख घातलेले संन्यासी. अशा जिवलग मित्राच्या स्मरणार्थ मला कांहींच करायला नको काय ? अलबत् केलेंच पाहिजे आणि ह्मणूनच त्यांच्या अद्भूत पूर्वचारित्राची रुपरेषा आंखण्याचा प्रयत्न मी करीत आहे.

कोणाचेंही चारित्र लिहितांना मुखपृष्ठावरच चारित्रनायकाचें चित्र देण्याचा प्रघात आहे, परंतु विदोबांच्या सुदैवानें किंवा वाचकांच्या

दुर्दैवानें मला फोटोग्राफी अवगत नाहीं, परंतु तात्पुरती त्यांची निगेटिव्ह कॉपी डोळ्यासमोर उभी करून कल्पनेच्या कुंचल्यानें व शब्दांच्या रंगानीं त्यांची प्रतिमा ठोकळ मानानें ठोकळ्या प्रमाणें उभी करायला कांहीच अडचण नाहीं.

विदोबांच्या पुढच्या दोन दातांना मार्च फॉरवर्ड चा हुकुम मिळाल्यामुळें ते खालच्या ओठावर मोठ्या अदबीने येऊन उभे होते. या दोन दंतबहाद्दरांचा पोषाख पिवळाच असे. नाकाला सिट् डाउन ची देवाज्ञा झाल्यामुळे डोळे अगदी हिरवे पिवळे झाले होते तोंडाचा लांबटपणा व कातडीचा काळसरपणा यांच्या एकवाक्यतेनें तोंडाला आफ्रिकेचा आकार आला होता. आणि डोळे व नाक यांच्याकडे पाहिलें ह्मणजे या आफ्रिकेंत कांहीं चिनी लोकांनी वसाहत केली आहे कीं काय असा सहज भास होई. विदोबांची स्मरणशक्ति तर इतकी चलाख होती कीं, कोणतीही गोष्ट विसरण्यांत तिच्या इतकीं चलाखी कोणाच्याही स्मरणशक्तीत नव्हती, विदोबांच्या शिक्षणक्रमाबद्दल विचार करतांना कांही ठळक गोष्टीचाच विचार करणे भाग आहे कारण सर्व कांही लिहूं ह्मटलें तर एक भारत होईल असो. विदोबांच्या आयुष्यांतील एक ठळक प्रसंग. त्यावेळीं आह्मी पहिली इंग्रजीत होतो, मास्तर भूगोल शिकवीत होते. विदोबांना कविता करण्याचा नाद ' जहां न पहुंचे रवि तहां पहुंचे कवि ' या न्यायाप्रमाणें विदोबांचे मन त्यावेळीं स्वयंपाक घरांत गुंतले होते.

मास्तरांनी याच समयी विदोबांना कल्पनेच्या आरामवाटिकेतून ओढून आणून 'खंड किती आहेत ?' ह्मणून प्रश्न केला, विदोबांनी पण, जरा रागात "कळखंड, एरखंड, लेखंड, श्रीखंड"—वगैरे नावे फटाफट सांगण्यास सुरवात केली, पण मास्तर कसले खट, त्यांनी आपल्या पांचही बोटांनी विदोबांच्या कपोलखंडावर पांचहि खंडाचा नकाशा रंगवून विदोबांना श्रीखंडाप्रमाणे थंड केले. नंतर परिक्षा आली, यावेळीं आमच्या नशीवानें पुरी गल्लत खाल्ली आणि आमची ताटातूट झाली. कालान्तरानें विदोबा हाशहुश करीत म्याट्रिकच्या कल्याण दरवाजाजवळ येऊन पोहोचले या वेळीं मी कॉलेजमध्यें होतो, तरी मी विदोबांची मैत्री कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत होतो नेहमीच्या संवयीप्रमाणें विदोबांनी ४—५ फेल्युअर्स घेतलींच, शेवटी मी त्यांना या अनर्थाचे कारण विचारलें; तेव्हां ते ह्मणतात "बाबारे करणार काय, पहिल्या वर्षी पाश होईन ह्मटलें टर मांजर आडव गेलं, दुसऱ्या वर्षी टापच आला, टिशरे वर्षी फॉर्मच डिला णाही. चौठे वर्षी फोर्म मिळाला पण पेपर वाईट गेले आणि पांचवे वर्षी पेपर चांगले गेले पण टारच आली नाही." (ही त्यांची भाषा!!) मी त्यांचे सांत्वन करण्याचा बराच प्रयत्न केला परंतु त्यांच्या वर्तुळाकार बनलेल्या चेहऱ्याला लंबवर्तुळाकार येईना.

एक वर्षानंतर विदोबा कॉलेज मध्यें येऊन ह्मणतात. "अण्णा टूं यावेळी मॅट्रिकमध्यें अशटास टर किटीरे बरं झाल्ं अशट. टूल्या डिग्रेड केला टर आमच्याच वर्गाट ये बरं" इतके बोलून

आमचे परमस्नेही थोडावेळ थांबल आजूबाजूची मुले कां हंसतात हें त्यांना कळेना. मी त्यांचे सांत्वन करण्यासाठीं ह्मटलें. " विदोबा घाबरूं नका. मोठ मोठया ऋषींनी सुद्धां १२ वर्षे तप केले मग तुमची आमची काय कथा, तुमचीं तर आताशा कुठे पांच वर्षे झाली आहेत, अजून सात वर्षे तुमचीच आहेत " हें ऐकून विदोबांचे बरेच समाधान झाले, परंतु या नंतर लवकरच विदोबांनी शिक्षणावर पाणी सोडून ( कां कोण जाणें ? ) स्वतःचें पाणिग्रहण करुन घेण्याचा प्रयत्न आरंभिला या कामीं मी त्यांना शक्य तेवढी मदत केली. पण व्यर्थ. पदव्यांची संख्या मोजण्यापेक्षां मिशांचा मोठेपणा मापून जर मुली देण्याची वहिवाट असती तर विदोबासारखा सिकंदर नशीबाचा कोणीच सांपडला नसता. असो. माझा मात्र बराच वेळ फुकट जाऊं लागला " अजून कां लग्न जमत नाहीं ?" असा कोणी प्रश्न केला तर त्याला काय सबब सांगावी याच्यातच माझा वेळ जाऊं लागला. कधी कधी मी" "मुलाला आय. सी. एस. ला जायचें आहे ह्मणून लग्न करीत नाहीं. कधीं कधीं ' मुलाला मंगळ आहे ' कधी कधी " मुलगी मुला इतकी शिकली नाही" कधी "यंदा कर्तव्य नाही," वगैरे सबबी सांगून वेळ मारुन नेई. शेवटी निरुपाय होऊन मी विदोबांच्या सल्ल्याने वर्तमानपत्रांत एक " वधु पाहिजे " अशी मोठी जाहिरात दिली ती नमुन्यादाखल देत आहे.

मौजच माज.

सोनेरी संधी

सोनेरी संधी

## वधू पाहिजे.

कळविण्यास आनंद वाटतो कीं, राजश्री विद्याधर म. ठोकळे, ( मॅट्रीक फेल ) त्याना त्यांच्या गावांत स्थळ मिळत नसल्याकारणानें पूर्ण मोकळे आहेत, सबब मुलीच्या बापानी आपली मुलगी प्रथम त्यांनाच देण्याची व्यवस्था करावी.

विशेष माहिती:—

(१) वराचें वय:—साडे चोवीस

(२) वराचा वर्ण:—वधूला पंसत पडेल असाच

(३) हुंडा करणी माफ

(४) वराला कविता करण्याचा नाद आहे.

वरील जाहिरात देऊन आज पांच वर्षे झालीं तरी विदोबा त्या वांचून विधूर आहेत, हल्ली मी बडोधास आहे व विदोबा भू—गोला-चर आहेत.

ऑगस्ट १९२८



# एकांतांतील हृद्‌योद्गार.

( ले.–वसंत–मित्र )

**अधोऽधो गच्छन्ति भवति विनिपातः शतमुखः ।**

ही म्हण आज अक्षरशः अनुभवास येत आहे. स्वायत्तता नष्ट झाल्यावरोबर प्रथम कांहीं दिवस सापाच्या तुटलेल्या शेपटीप्रमाण वळवळ–स्वाभिमानाची वळवळ चालु होती. हळूहळू ती बंद पडली व त्या पुढील पिढी कर्तृत्वहीन–मुख्यतः स्वाभिमान–शून्य–बनली. एकदां स्वाभिमान नष्ट झाला म्हणजे प्रारंभीच्या अवतरणांत म्हटल्या प्रमाणें हजारो वाटांनी एक सारखी अवनती होत जाते. आणि ही अवनतीची गती किती खोल आहे याचा कोणाही महाबुद्धिवंताला सुद्धां पत्ता लागलेला नाहीं. आपलेंच उदाहरण पहा. ज्यांनी सुवर्णाच्या राशींत लोळावे, जगताच्या राजांनी ज्यांचे चरणोदक घ्यावे, आपलेच हात आपल्या हातांनी बांधून घेण्याला तयार व्हावे इतका परत्र देशस्थ लोकांना दरारा, त्याच पूर्वजांच्या दुसऱ्या तिसऱ्या पिढींतिल लोकांनी परक्याच्या चरण धूळीला पवित्र मानावे, जगांतील प्रत्येक मनुष्या पेक्षां स्वतःला नीच समजावे, क्षुद्र, नीच, वेवकुफ म्हणून झिड कारिलें असतां संताप हीं येऊं नये? शिव ! शिव ! परवशते ! तुझी लीला परमेश्वरा इतकीच अगाध आहे. परंतु हे संत–जनोच्छेदिनी–

चामुंडे ! कांहीतरी परमेश्वराची भीति बाळग ! तुला काय ईश्वराने कोमल मन:पद्मावर जहर वर्षविण्या करितां निर्माण केले आहे ? स्वाभिमानाच्या अग्नीवर षंढत्वाचे पाणीओतण्या करितां, सत्यव्रताच्या तीक्ष्ण धारेला बोथट करण्याकरिता, प्रेममय जीवनांत विष काल-विण्याकरितां कां हे, सैतान—सहचरी, तूं उत्पन्न झाली आहेस ? कृपा कर आणि ह्या सुवर्णभूमी म्हणून गाजलेल्या हिंद—जननीला दिगंबरा करूं नकोस. तुझ्या विहाराला अगदीं योग्य असा प्रदेश कुठें दाखवूं ? कोणच्या दिशेला पाहुं ? छे ! नाहीं ! तूं कोठेंही जावेस असें मी तुला कसें म्हणूं ? जें आम्हांला दुःखकारक, जें आम्हांला तिरस्करणीय तें दुसरीकडे जावें असे म्हणूं तरी कसें ? परंतु परमेश्वरानें तुला नरकाची प्रतिमा म्हणून उत्पन्न केलें असेल व याच देही आम्हांला नर्कवासाची प्रचीति तूं घडवून आणित असशील तर तूं जा. कोठें तें मी सांगू शकत नाहीं. परंतु तूं जा, कृपा कर बया तूं चालती हो, तूं गेलीस म्हणजे स्वाभि-मानाची ज्योत पेटूं लागेल, अनेक तत्वांची भाषणें करण्यापेक्षां एका-देच तत्व आचरणांत आणण्यांत जन्म घालविण्याची प्रवृत्ती होईल. अन्यायाची चीड येऊं लागेल, आत्मश्रद्धा उत्पन्न होईल, कोणालाही कपटपटुत्वानें आमच्या डोक्यावर नाचतां येणार नाहीं. आम्ही स्वायत्त होऊं, अखिल जगांत मंगळ मंगलमय करून टाकूं पण मी हें तुला काय सांगत बसलों, या माझ्या हृदयाला क्षणभर तुझे पाश विसरावयास लावणाऱ्या कल्पना—मधुर रम्य कल्पना—मी तुला सांगणे म्हणजे

चोराच्या–हातीं जामदारखाना देणे आहे, परंतु ध्यानांत ठेव ईश्वर–प्रेरणेच्या प्रगूढ शक्तीनें याच कल्पनांच्या जोरावर एक दिवस तुझीं बंधनें ताडें ताड तोडून मोकळा होईन.

मे १९२८.

---



## अहमदाबाद प्रशस्ति.

( लेखकः—गडकऱ्यांच्या "कवींच्या कारखान्यांतील" एक मजूर. )

( दिंडी. )

सदा उतरी आमदाबाद गांव
सार्थ होई ह्मणुनि या हेंचि नांव
तया वर्णाया बुद्धि देइ देवा
कृपा तव ना मम कोण तरी केवा ॥१॥

पथीं मोऱ्या किति हो वाहताती
तदा ठाण्याचें स्मरण खचित देती
धूळ पथि ती तों राशिवरी रास
वायु येतां किति लोळ उठति खास ॥२॥

गांव तेथें माहारवडा पाहीं
जरिहि गांधी–वास्तव्य तेथ होई
सिनेमा तो विडि काफि चहापान
पथीं जातां पदपदां ये दिसून ॥३॥

*　*　*　*

अतां खाणावळ वर्णुं यथा–शक्ती
जिची गाती क्षितिंत या सतत ख्याती
× × × × बाइचें नाव जाणा
जिची बेपर्वा जुमानि ना कोणा ॥४॥

आधिं येतां " करुं नका अशी घाई "
उशिर होतां " किति वेळ होइ बाई "
सर्व येतां " अशि गर्दि नको मातें "
" एक एका वाढणें शक्य ना तें ॥५॥

रोज येती बोलणीं हीचि कानी
काय करणें परि बोलतो न कोणी
स्वगृहिं राजासम जयाची मिजास
सुनेसम तो करि सहन श्वश्रुवास ॥६॥

दोन भाज्या चटणीहि ती सकाळीं
परी एकचि कीं होइ दुज्यावेळीं

आमटी ती करि बरोबरी जलासीं
एक तक्राचि हो तुल्य कीं तियेशीं ॥७॥
विजेसम तें वाढणें असे तेथ
मागण्यासी नच वळ कुणा होत।
पार्लमेंटापरि मूक होति ताई
धीर करुनी जरि मागि कुणी कांहीं ॥८॥

* * * *

जधीं वाई वसतसे दिवस चार
जाऊं गुजराथीं विशितं मौज फार!
वरा रस्ता, अशि जमिन जेथ घाण
नको वाटे जेवणें तदा जाण ॥९॥
अंगि घर्माच्या वाहताति धारा
सोवळ्यासम तें वस्त्र होय पोरां!
वानहस्तें जे वाढताति अन्न
गंधमात्रेंची होय समाधान ॥१०॥
दोन आण्याची थाळि, तूप आगा
माजि आण्याची, दही एक आणा।
दोन आणे "पासेर पुरीं मागा
"एक सोंणह" विल मिळें "हातआना" ॥११॥

* * * *

अगा पोटा ! तूं जरी या जगांत
वर्ततांना तरि काय कार्य होत ।
कोण झटता मग कोण कष्टवीता
तनू अपुली कीं, परप्रांति जाता ॥१२॥
गमासि मजसी श्रीकृष्ण दुजा खासा
कर्मयोगी बनविशी जना कैसा ।
शुभाशुभ वा करविशी तूंचि कर्म
तूज पुढती हारती सर्व धर्म ॥१३॥

*　　*　　*　　*

गिरणिनाजीं वय रुप लया गेलें
स्त्रिया, मुलगे आणि वृद्धही मिळाले ।
दिवस अवघा कामांत जधीं जाय
गृहीं येतां मृतसमचि होति ! हाय ! ॥१४॥
"लाल अंबा," तो मोहनही बन्सी
लाल हारिचे एकेक गमति खासे ।
बोल गुजराथी, गिरणिनाद फार
ऐकुं येईना, शिजतसे शरीर ॥१५॥
म्हणा "कारे" तरि करी कधीं "कूं" न
म्हणुनि ह्मणती जन त्यास कारकून ।
श्रेय कामाचें वरिष्ठास जाई
दुःख, लाथा, तत्पदीं सदा येई ॥१६॥

कारकूनहिं बहु कुढे मनीं होती
नऊ घंटे ते काम ही करीती ।
तीस रुपयांवरि दमडी एक नाहीं
करा सेवा जरि वर्ष दशक पाही ॥ ॥१७॥

*   *   *   *

दिसत गाईचा तदा अहो तांडा
हाति दंडा हांकितो तया लांडा ।
हिंदु आह्मीं बघु षंढ स्वस्थचित्त
व्यर्थ शिवबा ! शिणलासि अस्मदर्थ ॥१८॥

*   *   *   *

घरीं करणेंना खर्च तुह्मी पाणी
खाळकूपही तो करि न स्वच्छ कोणी ।
जरी वाटे करुं स्नान तें यथेच्छ
"खोलि सोडा" वदतसे धनी स्वच्छ ॥१९॥

जिना होई शिडिसमचि कीं कठींण
अधाराविण कीं चढूं शके कोण ।
पायरीवरि पद राहि आडवें ना
नळी पोटरि आपटे उतरताना ॥२०॥

नदी साबरमति रमति जिथे गांधी
तेथ जातां शमण्यासि मनोव्याधी ।

पदर माथ्याचा जिथें ना उडावा
प्रकटवक्ष स्त्री–गणाचि दृष्टि यावा ॥२१॥

*            *            *            *

चला बाजारीं, धनालागिं वेडे
सर्व दिसती, शरिराचि करती काडें ।
नको वाङ्मय, संगीत, वाद्य, चित्र
मोह लक्ष्मीचा अहा ? किति विचित्र ॥२२॥

*            *            *            *

मराठ्यांच्या परि समाजांत चाला
चित्र दुसरें तें दिसे तुह्मा डोळा ।
असति डॉक्टर, वा वकिल, कारकून
तारवाले, व्यापारि परी कोण ॥२३॥

*            *            *            *

## उपसंहार.

दिसति पर्वत दुरुनीच फार रम्य
जवळिं येतां परि दिसत नसे साम्य ।
कुठें खादी ? वा, असहकारिता ती
सत्य ? निष्ठा ? ऐकिली ज्यांचि कीर्ति ॥२४॥

मार्च १९२६.

# हिंदुसंघटन व जाती.

( लेखकः- श्री. श्रीपाद सदाशिव शेवडे ).

आजकाल हिंदुसमाजांतील जातींच्या संख्येची वाढ अपरिमितपणें झाली असून त्यापासून पुष्कळ अनिष्ट परिणाम होत आहेत. हिंदुसमाजात प्रथम एक दोनच मुख्य जाती होत्या. या जातींत पुढें दिवसें-दिवस पोटजाती व त्या पोटजातींच्याही पोटजाती असा प्रकार होऊन त्या उत्तरोत्तर वाढतच गेल्या; व शेवटीं आजच्या स्थितीस त्यांचें प्रमाण इतके वाढले आहे की आता त्या कमी करण्याची अत्यंत आवश्यकता वाटूं लागली आहे. जसे, एखादे गळू फार वाढत गेलें ह्मणजे कापावे लागतें, अगर प्रजा फार वाढत गेली ह्मणजे भूकंपादि प्रलयकारणें उपस्थित होतात, किंवा आज पाश्चात्यांत सुधारणेची परिसीमा झाल्यामुळे 'बॅक टु नेचर' हें रूस्सो चें तत्त्व त्यांच्या मनावर बिंबू लागलें आहे, त्यातलाच हा एक प्रकार आहे. या जातींच्या वाढीपासून असे कोणते दुष्परिणाम होतात कीं ह्या कमी करण्याची आवश्यकता वाटावी, तसेंच ह्या कमी करावयाच्या झाल्यास कशा कमी कराव्या या दोन गोष्टींचा विचार करण्यापूर्वी, पूर्वी असलेल्या एक अगर दोन अल्प जातीं कालांतरानें कशा वाढत गेल्या हें आपण ऐतिहासिक दृष्टीने पाहू.

## हिंदुसंगटन व जाती.

वास्तविक पाहता हा विषय एका संपूर्ण स्वतंत्र व्याख्यानाचा अगर लेखाचा आहे, तरी तो येथे संक्षिप्त स्वरूपांत देणें अस्थानीं नसून आवश्यक आहे. मात्र त्यापूर्वी एका समजुतीचें निराकरण केलें पाहिजे. आपल्याकडे जातिभेद आणि चातुर्वण्य या गोष्टी एकच अशी समजूत होऊन जातिभेदास धार्मिक पाठिंबा आहे अशी लोकांची समजूत आहे, चातुर्वर्ण्य व जातिमय समाज या गोष्टी एक आहेत व तात्त्विक चार वर्ण ते जातीच आहेत, त्यांच्याच पुढें निर निराळ्या कारणानें पोटजाती पडल्या इत्यादि........अशा तऱ्हेची बहुतेकांची समजूत झालेली दिसते. परंतु चातुर्वर्ण्य धार्मिक पायावर उभारलेलें असून, जातिभेद सामाजिक पायावर अवलबूंन आहे. याकरितां जातींचा पूर्वेतिहास पाहिला पाहिजे. जातींच्या विकासाच्या प्रश्नाचा विचार करतां, जात ह्मणजे काय हा प्रश्न आपल्यापुढे प्रथम उभा राहतो. या प्रश्नाचें योग्य उत्तर देणे अगर जातीची व्याख्या करणे या गोष्टीं अवघड आहेत. "जाति या शब्दाचा मूळ अर्थ 'जन्म' अगर 'जन्मसिद्ध स्वरूप' (हा अर्थ फक्त घोडा, सिंह, वगैरे प्राण्यांच्या वर्गास लावण्यांत येतो) असून पुढ जाति ह्मणजे जनन–वैशिष्ट्य–मूलक सादृश्य अगर समुच्चय हीं कल्पना प्रचलित झाली. जाति हा एक सदृश्य मनुष्यांचा समुच्चय होय. या समुच्चया मध्यें आपल्या एकत्वाची व इतरांपासून भिन्नत्वाची भावना असते. जातीच्या व्याख्येंसंबंधी स्थूल लक्षण ह्मटलें ह्मणजे 'जन्मना जायते संघे प्रवेशो नान्यतः कदा। संघ मर्यादित क्षेत्रं विवाहे जातिरुच्यते'

याचा अर्थ ज्या विशिष्ट संघामध्ये प्रवेश जन्मानेच होतो आणि दुसऱ्या कोणत्याही कारणाने होत नाहीं व ज्या संघांतील लोकास ह्या संघाबाहेर लग्न करिता येत नाही त्या संघास जाति ह्मणावें" * मेगॅस्थिनीसनें जातीचीं दोन मुख्य लक्षणे सांगितली आहेत. जात ही विवाहबंधन ( उ० एका जातीने दुसऱ्या जातीशी विवाह-संबंध आणूं नये ) व धंद्याचें बंधन ( उ० एका जातीनें स्वतः-खेरीज दुसऱ्याचा धंदा करूं नये) यांवर अवलंबून असते.× जातीचें वास्तव्य हिंदुस्थानांत ५००० वर्षांपूर्वी असल्याबद्दल ऋग्वेदातील चातुर्वर्ण्यविषयक ऋचेंत उल्लेख आहे. इण्डो इराणियन लोकांत भटजी, लढवय्ये, आदिकरून चार वर्ग होते व त्यांत भटजींना सर्वश्रेष्ठ मान असे. यावरून इण्डो इराणियनांच्या समकालीन असलेल्या इण्डो आर्यन लोकांनी ५००० वर्षां पूर्वी हिंदुकुश पर्वतावरून जातीचें बीज आपल्या बरोबर आणले असावे असें दिसते. ते आले त्यावेळेस पंजाबांत द्राविड वसति होती. आज हिंदुस्थानांत आर्यन, मोंगोलियन,

* महाराष्ट्रीय ज्ञानकोश–'जातिभेद'

× No one is allowed to marry out of his own caste or exercise any calling except his own.

—*Megasthenes.*

(or)

Caste is based on restriction of marriage coupled with restriction of occupation.

—*C. V. Vaidya*, (Epic India).

व द्राविड अशी तीन रक्तें आहेत. कृतयुगांतील आर्य ( ह्मणजे हिंदुस्थानांत येण्याच्याही पूर्वी ) सर्वच ब्राह्मण होते असें रामायणाच्या आधारावरून सिद्ध होते. पुढे त्रेतायुगांत त्यांचें ब्राह्मण व क्षत्रिय असे दोन भाग पडले. वेदपठन, श्रुतिप्रसार, व यज्ञकर्म करणारे ब्राह्मण समजले जात व क्षत्रिय लोक युद्धाला वाहिलेले असत. त्यावेळेस मात्र परस्परांत विवाह रूढ होते. पुढे पंजाबांत आल्यावर तेथे पूर्वी वास करणाऱ्या शूद्रांवर जय मिळवून त्यांना आपले अंकित करण्याचे काम क्षत्रियांस मिळून त्यांचे यज्ञ करण्याचे काम ब्राह्मणांस मिळाले. ब्राह्मणात आनुवंशिकरीत्याच बुद्धीचे प्रमाण ज्यास्त असल्यामुळे तेच त्या कामास योग्य होते. याच सुमारास ह्मणजे पंजाबांत आल्यावर तेथील सुपीक जमिनीच्या योगानें विश अथवा वैश्य ही जात अस्तित्वात आली. यांचा धंदा व्यापाराचा असे व त्यांच्यांत व वरील दोन जातींत परस्पर विवाह रूढ होते. हे सर्व मूळचे एकच आर्य ब्राह्मण हें सांगावयास नकोच. पंजाबचे मूळचे रहिवासी दास अथवा शूद्र यांची जात अगदी निराळी असून नवीन आलेले आर्य स्वतःस उच्च व त्यांस नीच असे समजून आज यूरोपियन लोक हिंदूस वागवितात त्याप्रमाणे त्यास शेतात राबवयास लावीत व त्यांचेकडून मेहनतीची सर्व कामे करवून घेत. ब्राह्मणांपासून झालेली तिन्ही जातींतील स्त्रियांची प्रजा ब्राह्मण च असे. आर्य—शूद्र विवाह मात्र तेव्हां रूढ नव्हते. गोरे आर्य काळ्या शूद्रांशीं विवाह संबंध ठेवण्यास सिद्ध नसत. परंतु बहुतेक वैश्य, कांहीं

क्षत्रिय, व क्वचित् ब्राह्मण, असले संबंध घडवून आणीत. धार्मिक ब्राह्मणांस हे संमत नव्हते व ते ब्राह्मण व क्षत्रिय यांपासून झालेल्या शूद्र पुत्रांस अनुक्रमें 'पारशव' ( शवात् परः—शवापेक्षांही वाईट ) व 'उग्र' असें ह्मणत. वैश्यांचा मात्र धंद्यानिमित्त शूद्रांशी ज्यास्त संबंध येत असल्याकारणाने ते ही आडकाठी पाळीत नसत. वैश्य शूद्र प्रजेला वैश्य अगर अंबष्ठ ह्मणत. (बौधायनानें यांना रथकार—अथवा सुतार—ही संज्ञा दिली आहे व हे लोक आजही ब्राह्मणाप्रमाणे जानवीं घालतात.) यावरून सर्व जाती वाढण्याचे मूळ कारण शूद्र स्त्री आहे हे स्पष्ट आहे. ज्याप्रमाणे यूरोपियन पुरुष व हिंदी स्त्री यांच्या प्रजेस यूरोपियन ह्मणण्यास व आपल्या जातीत घेण्यास आज यूरोपियन लोक तयार नाहीत व त्या प्रजेस यूरेजिअन ही नवी संज्ञा देऊन त्यांची नवी जात बनविण्यांत येते व त्यांचा दर्जा हलका समजण्यांत येतो त्याचप्रमाणे त्या वेळेस आर्यलोक आर्य—शूद्रा प्रजेस मानीत असत व वागवीत असत. पुढें ब्राह्मण पुरुष व वैश्य स्त्री यांच्या प्रजेस ब्राह्मण ह्मणण्यास लोक तयार होईनासे झाले व आणखी नवीन जाती निर्माण झाल्या........प्रत्येक धंदा आनुवंशिकरीत्या पाळला जाऊन जात कायम रहात असे. शागीर्द, कायस्थ इत्यादि याचींच उदाहरणे होत.

आणखी एक महत्वाची गोष्ट राहिली. ती अशी की ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यांच्या प्रजेस ब्राह्मणांनी जातिबहिष्कृत केले व त्यांचा अंत्यज वर्ग झाला. याच वर्गांत चांडालांचा व इतर अंत्यज हिंदूंचा समावेश होतो.

यानंतर आर्यांचे हिंदुस्थानात दुसरे देशांतर ( इमिग्रेशन ) झालें. या वेळेस आलेल्या आर्यांना पूर्वी वसलेल्या आर्यांनी यमुनेच्या बाजूला पाठविले. जातांना त्यांच्याबरोबर स्त्रिया कमी असल्या-कारणाने त्यांनी तेथे द्रविडं स्त्रिया करण्यास सुरवात केली व आर्य-द्राविड प्रजा उदयास आली. जाती वाढत चालल्या व एकाहून अधिक नवरे करण्याची चाल ( पोलॅन्ड्री ) प्रचारांत आली.

महाभारतांतील नहुष—युधिष्ठिर संवाद जातीचा विचार करताना फार महत्त्वाचा आहे. तेथे ब्राह्मण कोणास ह्मणावे ! असा प्रश्न नहु-षाने केला असतां युधिष्ठिर सांगतातः—" ज्याच्याजवळ सत्य, दान आदि गुण असतील तो कोणीही असला तरी ब्राह्मण समजला पाहिज व नसतील तो शूद्र समजावा "........" निरनिराळ्या वंशांच्या संकराने जाती दुष्परीक्ष्य झाल्या आहेत, कारिता तत्त्वदर्शी लोक शीलाला प्राधान्य देतात. शीलाशिवाय जातिभेद व्यर्थ आहेत....* यावरून जातिभेदाचे मुख्य तत्त्व उत्तम शील व उत्तम गुण हे आहे ( नसल्यास असावयास पाहिजे ) हें स्पष्ट आहे.

यापुढे बुद्धतत्त्व अस्तित्वांत आले व सर्व जातिभेद बाजूला सारून जात्यैक्य करण्याबद्दल बौद्धांकडून प्रयत्न करण्यात आले. परंतु कालांतराने त्यांच्यांत अनीति पसरू लागली व बौद्धधर्माचा

---

* तस्माच्छीलं प्रधानेष्टं विदु र्ये तत्त्वदर्शिनः ॥
कृतकृत्याः पुनर्वर्णा यदि वृत्तं न विद्यते ।
संकरस्त्वत्र राजेंद्र बलवान्प्रसमीक्षितः ॥ वनपर्व १८०

इ. स. ८०० च्या सुमारास पाडाव झाला. हिंदु धर्म यानंतर जोराने अंमलात आला व धर्मविषयक व जातिविषयक प्रतिबंध वाढले. ब्राह्मणांची ब्राह्मणाशिवाय इतर जातींशी विवाह करण्याची मुभा बंद झाली. या शिवाय जैनांचाही बौद्धांप्रमाणे प्रयत्न झाला परंतु तो व्यर्थ गेला. याला कारण ब्राह्मणांचे कर्मांच्या वर्गवारीने असलेले संस्कारांचे प्राबल्य होय. संस्काररहित बौद्धांस ब्राह्मण; शूद्र ही संज्ञा देत, व 'जन्मना जायते शूद्रः संस्कारैर्द्विज उच्यते' असे ह्मणत. या ब्राह्मणांच्या प्रवृत्तिस आळा बसण्याकरिता ब्राह्मणांचे काही विशिष्ट मानण्यांत येणारे हक्क आपणासही असावेत ह्मणून क्षत्रियांनीं प्रयत्न सुरू केले परंतु त्यांत त्यांना क्वचित् यश आले व क्वचित् आले नाही. असो.

जातींचे वर्गीकरण त्यांच्या उत्पत्ति--वैशिष्ट्यावरून किंवा स्व-रूप--वैशिष्ट्यावरून करण्यांत आले आहे. या तत्त्वाप्रमाणें ज्ञानकोशकारवाल्यांनीं जातींचे सात वर्ग पाडले आहेत ते येणेप्रमाणें: (१) राष्ट्रजाति स्वरूपी जाति, (२) कर्मनिर्णीत जाति, (३) सांप्रदाय मूलक जाति, (५) संकरमूलक जाति, (५) राष्ट्रस्वरूपी जाति, (६) स्थानांतरमूलक जाति, व (७) भिन्नाचारमूलक जाति. या वर्गांतील भिन्नाचार मूलक जातीची हंसू लोटवणारीं उदाहरणे ब्रह्मश्री दिवेकर-शास्त्री यांनी येथे असतां आपल्या व्याख्यानांत सांगितलीच होतीं. इतर जातीं विषयींही वर थोडया फार प्रमाणात विवेचन झाले आहे. तेव्हां येथे विस्तार करण्यात अर्थ नाही.

## हिंदुसंघटन व जाती.

आपण आतांपर्यंत पोटजातींचा फारसा विचार केला नाही. तोही एक स्वतंत्र व विस्तृत विषय आहे. नुसत्या ब्राह्मणांचे उदाहरण घेतल्यास असे दिसते की ह्यांच्यामध्यें पंच गौडव पंच द्राविड असे मुख्य दहा प्रादेशिक भेद आहेत व ह्यांचे आणखी अनेक भेद आहेत. ब्राह्मणांच्या एकंदर ८०० जाती असून, सर्व जातींची मिळून संख्या ४००० आहे. ( महाराष्ट्रीय ज्ञानकोश 'ब्राह्मण' पहा ). आतां आपण जातिभेदांपासून होणाऱ्या दुष्परिणामाकडे व ते कमी करण्यास कोणते उपाय योजावे या प्रश्नाकडे वळूं.

जातिभेदापासून होणारा सर्वांत मोठा दुष्परिणाम ह्मटला ह्मणजे एकजातीयत्वाच्या किंबहुना एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचा नाश होय. आज आपण पहातो की ज्या घरांत नुसता प्रवेश करण्यास 'अस्पृश्यां' ना प्रतिबंध असतो त्याच घरां म्लेंच्छ अगर यवन यांना केव्हांही येण्यास, फार काय घरांतील दिवाणखान्यांतही येण्यास व वाटेल त्या वस्तूस शिवण्यास मुभा असत; इतकेंच नव्हे तर घराचे धना त्यांच्या पायाची धूळ घरांत आल्याबद्दल व हस्तांदोलनाच्या निमित्तानें त्यांचा स्पर्श झाल्याबद्दल स्वतःस पुनीत व धन्य समजतात. ही गोष्ट किती अन्याय्य आहे व यामुळे हिंदुसमाजांतील उपरिनिर्दिष्ट व्यक्तिंची मने किती दुखत असतील याचा विचार केला पाहिजे. बरें, पुनः, जर तो हिंदू धर्मांतर करून मुसलमान अगर ख्रिश्चन बनला तर त्याला खुशाल वाटेल तेथे प्रवेश व मान मिळतो. असे असता त्यांच्यात धर्मांतर करण्याची प्रवृत्ति उत्पन्न होउन वाढत

गेल्यास नवल तें कोणतें? तसेच त्यांच्यातील, इतर हिन्दूविषयी ममत्व कमी झाल्यास आश्चर्य ते काय? आज हिंदुस्थानाला ' हिंदु तितुका मेळवावा ' हें ब्रीदवाक्य आहे व (मॅन सेव्हड् इझ मॅन गॉट ) या म्हणीनुसार न गमावणे हे मिळविण्याप्रमाणे असल्याने असंख्य हिंदु करीत असलेल्या धर्मांतरांस आळा बसविण्यास नको काय? त्याचप्रमाणे डिव्हाइड ॲन्ड रूल ( फोडा आणि झोडा ) हे सांप्रतच्या राज्य कर्त्यांचें राजकीय तत्त्व फोल ठरवून नामशेष करणें इष्ट नव्हे काय?

जातिभेद हे :भांडणाचें व द्वेषाचे मूळ आहे. सद्यः स्थितींतील जातिभेदान्वये स्वतःस उच्च समजणारे लोक इतरांस नीच समजून त्यांचा वाटेल तसा अपमान करतात व त्यांस काही विशिष्ट हक्कांस पारखे बनवितात. यामुळे साहाजिकच परस्परांत द्वेष व भांडणे उपस्थित होतात. ब्राह्मण ब्राह्मणेतरवाद, मलबारांतील नायर थिय्या कलह वगैरे याचाच उदाहरणे होत. शिवाय कऱ्हाडे कोंकणस्थ अगर साथेद्रा—वडनगरा यांच्यामधील परस्पर भिन्नत्वाची भावनाही याचेच द्योतक होय.

दुसरे, भिन्नाचारमूलक व इतर तत्त्वानुसार जातींचे विभाग करणें कितीसे योग्य आहे ते पाहिले पाहिजे. उलटपक्षी ते क्वचित् हास्यो-त्पादकच होते. ही एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे की निरनिराळा आचार किंवा सांप्रदाय उच्चनीचता सिद्ध करूं शकत नाही. स्थानां—

तरानेहीं ही गोष्ट सप्रमाण ठरत नाही. त्याचप्रमाणे जेत्यांनी स्वतःला उच्च व जितांना नीच ह्मणणे बुद्धीस पटत नाही. तेव्हां या तत्त्वावर जाती विभागणे केव्हांही सत्यास धरून होणार नाही. जातीचे विभाग करते वेळी सत्य, समता, गुण वगैरे तत्त्वांचा प्रामुख्याने उपयोग केला पाहिजे; आणि ह्मणूनच वरील तत्त्वांवर विभागिलेल्या जातींनी अंतर्विवाहादि प्रचार रूढ करणे अनुचित नव्हे. रोटीव्यवहार (अन्नोदक व्यवहार) प्रचारात आणणे तर अत्यंत अवश्य आहे.

आतां राहिला प्रश्न संकरमूलक व कर्मनिर्णीत जातींचा! वर दिलेल्या इतिहासावरून ही गोष्ट नक्की आहे कीं हिंदुसमाजांतील आर्य हा एक भाग असून त्यांच्याच पुढे धंद्यानिमित्त अनेक जाती झाल्या आहेत. तेव्हां या अनेक जातींना एक होण्यास काहीही प्रत्यवाय रहात नाही. निदान नांवाने निराळे असले तरी त्या जातींतील लोकांना मनानें तरी आपण एक आहोत असे वाटण्यास अडचण नाही. जीव एक मिळाल्यावर नांवाला महत्त्व नसतें. ह्याचप्रमाणे हिंदुसमाजांतील दुसरा भाग दास अगर शूद्र या एक जातीपासून वाढलेल्या सर्व जातींनी आपसांतील भेद काढून एक जात करावी. तसेच उच्चनीचता ही जन्मतःच प्राप्त होते असे मानणे चुकीचे असल्याने व ती युधिष्ठिराने सांगितल्याप्रमाणे विद्या, सत्य, आदिकरून गुणांवर व वैयक्तिक पावित्र्यावर अवलंबून असते हे तत्त्व विद्वन्मान्य असल्याने वरील दोन जातींनी परस्परभिन्नत्वाच्या व उच्चनीचतेच्या कल्पनांना फांटा दिला पाहिजे. हे विद्वन्मान्य तत्त्व थोड्या दिवसांत सर्वमान्य झाले पाहिजे.

आणि म्हणून वरील दोन जातींनी स्पृश्यास्पृश्यता काढून टाकून जमल्यास रोटीव्यवहार प्रचारांत आणला पाहिजे. लग्नव्यवहाराचा प्रश्न थोडा नाजुक असल्यामुळे त्यासंबंधांत कोणावरही जुलमाचा आग्रह करितां येत नाही. स्वतःच्या मताप्रमाणे व आवडीप्रमाणे वागणे कांहीं अपवादात्मक प्रसंगांखेरीज केव्हांही गैर नाही. आपली मुलगी अमक्या मुलाला द्यावा किंवा नाही हा प्रश्न वैयक्तिक आहे त्याचा निकालही वैयक्तिक विचारावर अवलंबून ठेविला पाहिजे. म्हणून मात्र सरसहा कऱ्हाडे--कोंकणस्थ, देशस्थ—देवरुखे, इत्यादि विवाह होऊं दिले न पाहिजेत असे म्हणणे योग्य होणार नाही. कोणी असले संबंध घडवून आणल्यास त समाजांत जातिबहिष्कृत ठरत नाहीत. घरांत स्वतःच्या धार्मिक भावनेस अनुसरून खुशाल वागावे परंतु समाजांत फाजील धार्मिक भावना नसली पाहिजे. ब्रह्मश्री दिवेकरशास्त्र—यांच्या भाषेत बोलावयाचे म्हणजे घरांत जरी बायकांनी विटाळ पाळला तरी चालेल, परंतु सार्वजनिक प्रसंगी बायकांत 'शिवशील, शिवशील' हा प्रकार असतां कामा नये.

अशा रीतीने हिंदुसमाजात एकजातीयत्वाची भावना उत्पन्न होणे समाजाला व राष्ट्राला हितावह आहे. 'सध्यांची जी राष्ट्रीय भावना सर्व देशभर जागृत झाली आहे तिचे पर्यवसान एक मोठी जात निर्माण करण्याकडे होईल किंवा नाही हा प्रश्न भवितव्याच्या अंधःकारांत लपला आहे' असे उद्गार ज्ञानकोशकार काढतात. परंतु 'a man makes his own fortune' या न्यायाने भवित-

ऱ्यता घडविणे तरी आपल्या हातांत आहे व ह्मणूनच चातुर्वण्याच्या पायावर उभारलेली एक 'आर्य' जात आपण पुनरपि प्रस्थापित केली पाहिजे. एवढयाकारितां पुढील पन्नास वर्षांकडे लक्ष देऊन एक सामाजिक योजना कालांतराने जनतेपुढे येईलच व तिचा विचारही जनता करीलच. प्रस्तुतचा उपक्रम त्या विचाराची पूर्वसिद्धता करण्या कारितां आहे.

नवीन होऊं घातलेल्या योजनेतील दोन मुख्य अंगें ह्मणजे एक दैवत व एक सामाजिक ग्रंथ ही होत. उपास्य दैवत श्रीसूर्यनारायण असावे व ग्रंथ श्रीमद्भगवद्गीता असावा या विषयावर मुळीच मतभेद होणार नाही हे निःसंशय होय. असो.

या लेखाचा परिणाम सर्व हिंदू जातींत ऐक्याची व ममत्वाची भावना—एकजातियत्वाच्या योजनेची पहिली पायरी—जागृत करण्याकडे झाल्यास प्रस्तुत लेखकास लेखाचे सार्थक्य झाल्या सारखे वाटेल.



# मुलीनो तुम्ही बंड झेंडा उभारा.

रचनाकार—श्री. वि. मा देशपांडे.

---

स्वयें कष्टुनी ज्ञान प्राप्ती करावी ।
तुम्हीं आर्य—रूढी मनी वीवरावी ॥
करोनी दुरी लाज, मांडा विचारा ।
मुलीनो तुम्ही बंड झेंडा उभारा ॥ १ ॥
जनांची तुम्ही आज रीती निहाळा ।
गृहीं खिन्नता, जन्मता रत्न—बाला ॥
तधीपासुनी होय चिंता पित्याला ।
मुलीनो तुम्हीं बंड झेंडा उभारा ॥ २ ॥
विवाहाविषीं काळजी त्या पित्याला ।
तथा जाळितो प्रश्न हुंडा मनाला ॥
किती मोजता सौख्य, हा एक सारा ।
मुलीनो तुम्हीं बंड झेंडा उभारा ॥ ३ ॥
जमावी धना, रक्त पाणी करोनी ।
सुके बापुडा लग्न चिंता वरोनी ॥
विवाहीं परी जाचि जामात तोरा ।
मुलीनो तुम्हीं बंड झेंडा उभारा ॥ ४ ॥

## मुलींनो तुम्हीं बंड झेंडा उभारा.

ऋणें काढिती नाम राखावयाला ।
अहो नाम तें आज आहे कुणाला ॥
गुलामीं पचे देश हा एक सारा ।
मुलींनो तुम्ही बंड झेंडा उभारा ॥ ५ ॥

पिता तो करी कष्टुनी सर्व सारीं ।
मुलीसी परी संमती ना विचारी ॥
जया संगती मांडणे तों पसारा ।
मुलींनो तुम्ही बंड झेंडा उभारा ॥ ६ ॥

धनाभावि वा त्रासुनी शोधण्याला ।
विधूरा पिता आपुल्या दे मुलीला ॥
विवाहा अशा स्पष्ट बोला नकारा ।
मुलींनो तुम्हीं बंड झेंडा उभारा ॥ ७ ॥

अशीं होत कार्यें कधीं, ना ठरावें ।
धना, हक्क, राज्यार्थ लागे मरावे ॥
महातत्त्व जाणोनि सर्वें पुकारा।
मुलींनो तुम्ही बंड झेंडा उभारा ॥ ८ ॥

ऑगस्ट १९२८.

# मराठी भाषेचे शुद्धीकरण !

ले.—श्री. के. रा. भिडे.

" कोण मिस्टर जोशी; वेट ए बिट् प्लीज्. आय वुइल जस्ट ओपन दी डोअर. गुड मॉर्निंग, मिस्टर जोशी. आज उठायला भारी लेट झाला बुवा. कालच्या एंगेजमेंट्स् मुळे. रात्री ९ वाजे पर्यंत तर लेक्चर आणि पुढे मिड् नाईट् पर्यंत ड्रामा. आणि त्यांत आमचें टाइमपीस कालच रिपेअरला दिले, येथले रिपेअरचार्जेस् तरी किती एग्झॉर्बिटंट. बॉम्बे देखील याच्यापुढे चीप. वेल, पण तूं काल लेक्चरला कां आला नाहीस? मोठी स्प्लेन्डीड अपर्चूनिटी लूज् केलीस बुवा. कालचे लेक्चर किती ब्रिलियंट आणि अप् टु डेट् इन्फरमेशननी भरलेले! यु वोंट गेट् सच् ए नाइस् चान्स अगेन्. बिगिनिंगलाच ऑडिअन्सचे फेव्हरेबल् इंप्रेशन झाले लेक्चररच्या पर्सनॅलिटीने. आणि पुढे त्याचा इंप्रेसीव्ह टोन, ईझी डिलिव्हरी, आणि फ्लुअन्सी व अप्रोप्रिअेट् वर्डस् यूज् करण्याचे त्याचे स्किल, यांनी तर ओपिनियन् कन्फर्म झाले. अखेर पर्यंत ऑडिअन्स् कसा अगदी स्पेलबाउंड होता. वाइंडिंग्-अपच्या वेळी तर क्लायमॅक्स् केलान् त्याने आपल्या ऑरेटरीचा. सब्जेक्ट अगदी कॉमनप्लेस् "मराठीचें रीजनेरेशन" पण त्याने फारच इंटरेस्टींग्ली ट्रीट केलान्. सबंध स्पीच् मधील मेन् आणि प्रिन्सिपल आयडिया ही कीं, विदाउट् द फ्रीडम् ऑफ् लँग्वेज् सल्फ् गव्हर्मेंट एक्वायर करणं किंवा रिटेन् करणें ह्लगेज इट्स् नेक्स् टु इम्पॉसिबल.

परवाच्या आयरीश् रेव्होल्युशन्च्या टाईमचेच एक्झांपल् साईट केले त्यावेळी कोणी एका आइरीश लीडरला विचारले कीं, फ्रीडम् ऑफ यूअर लँग्वेज् ऑर् होमरूल यांत जर तुम्हांला चॉइस् दिला, तर ऑफ् दी टू, तुम्ही प्रिफर कोणते कराल? त्याने, वुइदाउट् दी लीस्ट् हेजिटेशन् अन्ड शॉट उत्तर दिले, फ्रीडम् ऑफ् माय मदरटंग. कारण होमरूल वुइल फॉलो इन् इट्स् ट्रेन. तात्पर्य, जोपर्यंत एखाद्या नेशन्च्या लॅंग्वेजमध्ये लाइफ आहे, तोंवरच त्याला फ्युचरची कांहीं होप् आहे. मी तर बुवा ह्या मुव्हमेन्टला हार्ट अॅन्ड सोल वर्क करण्याचा निश्चय केला आहे. तिकडे बॅरिस्टर सावरकर याच डायरेक्शनमध्ये ट्राय करीत आहेत. त्यांना जर थोडे ऑनेस्ट ऍन्ड अर्नेस्ट व सेल्फलेस् वर्कर्स किंवा फॉलोअर्स मिळतील तर ही मुव्हमेंट स्प्रेड करायला फार टाइम् लागणार नाही. फर्स्ट स्टेप म्हणून मी आता आपल्या यंग नॅशनल यूनिअन्च्या पुढल्या जनरल मिटींग मध्ये एक रेग्युलर रेझोल्युशन्च मुव्ह करतो की, ऍज फार अॅज पॉसिबल प्रत्येकाने क्लबच्या मिटींग्ज् मध्यें इंग्लिशवर्डस यूज करूं नयेत. पुढे ही मला एक ओरिजिनल् आयडिया सजेस्ट झाली आहे, ती ही कीं प्रत्यक अशा वर्डबद्दल एक एक पै फाइन् म्हणून ऑनररी ट्रेझररकडे भरावा आणि या फाइनचा जो फंड होइल, त्यांतून दर टर्मला एक बेस्ट मराठी कॉंट्रि-ब्यूशन् किंवा स्पीच करिता प्राइझ् ठेवावे. काय मिस्टर, डु यु लाइक् दि आयडिया? बाकी. युनिअन्च्या मॅनेजींग कमिटीचे जें इनर सर्कल् ते या प्रपोझलच्या थरली अगेन्स्ट आहे हे मला माहीत आहे. काय

म्हणे, सावरकर अगदी एक्स्ट्रीमला चालले. पण लेकहो, तुम्ही दुसऱ्या एक्स्ट्रीमला आहांत त्याची वाट काय ? री ॲक्शन् तितकेच स्ट्राँग झाल्या शिवाय नॉर्मल ॲन्ड गोल्डन् मीन् वर तुम्ही तरी कसे येणार ? उद्या सिनेमा किंवा ड्रामाला जायचे प्रपोझल येऊ द्या, की सगळे यूनॅनिमसली त्याला फॉर्, आणि परवां मी नुसते सजेस्ट केले, की, मराठी कॉन्व्हर्सेशन मध्ये इंग्लिश वर्डस नकोत तर ते म्हणे इम्पॉसिबल. कोणाला सीरिअसली ट्रायच करायला नको. सेल्फसॅक्रिफायसिंग स्पिरिट मुळी होली लॅकिंग्. बाकी ईट, ड्रिंक ॲन्ड मेक मेरी हाच ज्यांचा मॉटो ॲन्ड ॲम् आणि ईझी आर्मचेअर लाइफ हा ज्यांचा गोल, त्यांच्यापासून व्हॉट एल्स वुइ आर टु एक्सपेक्ट ? बाकी हे स्पिरिट् पहिल्या पासून नसते; स्कूल लाइफमध्ये फारच हाय आयडिअल्स असतात. हा मराठेच पहाना, लहानपणीं नांवाप्रमाणेंच मराठीचा सपोर्टर पुढें कॉलेज मध्यें आल्यावर आतां मालाच अपोज् करतो. हॅबिटने पहा कशा आय्‌डिआज् कंप्लीटली चेंज होतात त्या ! जाऊं दे तो टॉपिक. मात्र माझ्या रेझोल्युशन करतां, आय् वुइल लीव्ह नो स्टोन् अनटर्न्ड. आतां प्रत्येक मेंबरकडे जाऊन त्याचे व्होट इन् ॲडव्हान्स सिक्युअर करून ठेवतो. कॅन्व्हॅसींग इतके स्ट्राँग करणार कीं इन् स्पाइट ऑफ् अपोझीशन् फ्रॉम् दि मॅनेजिंग कमिटी, माझा रेझोल्युशन् ओव्हरव्हेल्मिंग मेजॉरिटीने कॅरी झालाच पाहिजे.

ऑल राइट. फार टाइम झाला ह्मणतोस. जा, पण आफ्टरनून टीला मात्र एग्झॅक्टली चारला ये.

जून १९२६ वेल् गुड्बाय् !"

# वक्तृत्व.

[ श्री. वैशंपायन ( अध्यक्ष तरुण–भारत मंडळ ) यांच्या ता. ३१–१०–२६ च्यां व्याख्यायाचा सारांश. ]

---

**अध्यक्ष महाराज आणि बंधु भगिनी हो,**

वक्तृत्व या विषयावर बोलण्याची मला वक्तृत्वोत्तेजक समाजाचे अध्यक्षांनी ( श्री० संत वकील ) आज्ञा केली व ती मीं मान्य केली याचे कारण मी एक वक्ता आहे असे नसून वक्तृत्व या विषयावर बोलल्याने ज्यांना वक्तृत्वाची आवड नसेल त्यांच्यांत तीं उत्पन्न व्हावी, ज्यांच्यांत ही कला आहे त्यांनी ती वाढवावी व ज्यांना आवड असेल त्यांनी ती वक्तृत्वकला मिळविण्यासाठी प्रयत्न करावा इत्यादि हेतूने मी या विषयावर बोलण्याचे पसंत केले. या विषयाचे हातपाय फार दूरवर पसरले आहेत तेव्हां एका भाषणात हा संपर्ण शक्य नाही. आपण सर्व ज्ञातेच आहात तेव्हां या विषयाची राहिलेली माहिती त्याला जोडून त्याची मनांत पूर्तता करून घ्यालच.

वक्तृत्वाशी प्रत्येंकाचा संबंध येतो. खरे पहाता वक्तृत्वाखेरीज जगांत कोणताही व्यवहार होउं शकत नाहीं. मुके, मुनि आणि जाणून बुजून न बोलणारे याखेरीज करून प्रत्येकाचा वक्तृत्वाशी

संबंध येतो. परंतु प्रत्येक बोलणाऱ्या गृहस्थाला वक्ता असें नामाभिधान देता येणार नाही. वक्तृत्व हा शब्द विशिष्ट अर्थानें योजलेला आहे. त्याची व्याख्या आता आपण ठरवूं. पहिला गुण वक्त्याच्या अंगी आवश्यक आहे तो हा की त्याचे बोलण्यात निश्चिति असली पाहिजे व स्वतःचे म्हणणे सुसंघटितरीतीने आणि संगतवार त्याला सांगता आले पाहिजे. आपले विचार सुसंघटित व परिणामकारक रीतीने बोलून दाखविणें याचे नांव वक्तृत्व. हे प्रत्येकाला येत नसते म्हणूनच वक्तृत्वाचा अभ्यास करण्याची आवश्यक्ता आहे. कांही मंडळी वादविवाद करतात व त्यांचा वाद संपत नाही. नंतर एक तिसरे सद्गृहस्थ येऊन त्यांचा मुद्दा समजून घेऊन तो वाद मिटवितात. तेव्हां या दोहोंपैकीं एक गृहस्थ म्हणतो "अहो तेच मी सांगत होतो." अरे, मग इतका वेळ तूं काय करीत होतास? तात्पर्य. त्याला आपले विचार नीट पद्धतशीर रीतीने मांडता येत नाहीत हेच होय. वक्त्याच्या अंगी जे गुण असायला पाहिजेत तें हे की ह्यानें लोकांना व्याख्यान देतांना प्रत्येकाला असे वाटले पाहिजे की "अरे, हेच माझे म्हणणे." व्याख्यान नुसते माहितीपूर्ण असून कामाचे नाहीं. तर प्रत्येकाच्या हृदयांतली गोष्ट बोलली पाहिजे. ज्या प्रमाणे डॉ. तळवलकर (सभेचे अध्यक्ष) इंजेक्शन देतात व ते शरीराचे प्रत्येक अवयवाला कळतें त्याप्रमाणे वक्त्याचा प्रत्येक शब्द हृदयाशी जाऊन भिडला पाहिजे. नाहीतर वक्त्याचें चऱ्हाट चाललेंच आहे व श्रोत्यांना ते केव्हां संपते असे वाटतेंच

आहे परंतु उठून जातां येत नाही. अशावेळी गडकऱ्यांची "शहाण्याला शब्दांचा मार" ही कोटी उलट्या अर्थाने यथार्थ लागू पडते. तेव्हां भाषण नुसते माहितीपूर्ण असावे इतकेच नव्हे तर लोकांना त्यामुळे आनंद वाटला पाहिजे. एका संस्कृत कवीने म्हटल्याप्रमाणें "शोकं विरामादपि" म्हणजे त्या भाषणाचा ओघ बंद पडतांच श्रोत्यांचे हृदय हळहळले पाहिजे याचे नांव वक्तृत्व. केव्हां एकदा ह्या आपले गुऱ्हाळ संपविलो आहे असे झाले तर ते वक्तृत्व खास नव्हे. सिसेरो, रोमचा नामांकित वक्ता, याने आपल्या ऑरेटर्स रिक्वायरमेंटस या पुस्तकात वक्तृत्वाची व्याख्या दिली आहे तो म्हणतो "An orator should instruct delight and animate the minds of his hearers." संस्कृत कवींनी सांगितल्याप्रमाणें दोनच गोष्टी सिसेरोने सांगितल्या नाहीत. नुसती माहिती आणि आल्हाद देऊन कामाचे नाही तर "Should animate the minds of his hearers." या दोहोपेक्षां ज्यास्त म्हणजे श्रोत्यांच्या भावना उचंबळून आणल्या पाहिजेत. भाषण असे पाहिजे की वक्त्याचे हातपाय लटलट न कापता श्रोत्यांच्या माना मात्र हालल्या पाहिजेत. सज्जनांची मान दोन वेळेसच वांकते. एकदा जगांत कोणतीही सुंदर गोष्ट दिसलीं म्हणजे आणि दुसऱ्यांदा म्हणजे ईश्वराला नमन करतांना. या शिवाय त्यांची मान कधीही हालायची नाही. कितीही तेजस्वी तरवार त्यांचे मानेवर पडली तरी त्यांची मान ताठची ताठ राहील; तुटेल पण वांकायची नाही. तेव्हां सज्जनांची मान डोलेल अशाच रीतीचे सुंदर वक्तृत्व पाहिजे.

वक्त्याचे अंगी कोणकोणते गुण आसावे लागतात याचे एक टिपण ह्याच पुस्तकांत सिसेरोनें दिले आहे. तो म्हणतो "An orator should have the acuteness of a logician, wisdom of the philosophers, language almost of the poets, memory of the lawyers and and elocution and gestures of the finest actor." वक्त्याचे अंगी खालील गुण बाणावे लागतात. ह्याची तर्कबुद्धि अत्यंत सूक्ष्म पाहिजे. ह्याचे दृष्टीतून कोणतीही गोष्ट निसटली न पाहिजे. तत्त्ववेत्त्यांचे शहाणपण ह्याचे अंगी पाहिजे, अर्थात् खोल दृष्टि पाहिजे. शब्दरचना काव्यमय असावी. मागे एकदा नवजीवन मध्ये एक स्फुट प्रसिद्ध झाले होते. ह्यात लेखकाने महाराष्ट्रीय लोकांची काव्य व अलंकार या वांचून भाषा नाही असे श्री. केळकरांना उद्देशून लिहिले होते. काही दिवसांनी मला आश्रमात जाण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यांच्याशी या गोष्टीचा वाद झाला व त्यांनी काही कुत्सित प्रश्न केला. त्यावर मीही मग उत्तर दिले "तर मग आमच्यांत पहिला मूर्ख निपजला म्हणजे ज्ञानेश्वर, कारण ज्ञानेश्वरीत एक श्लोक असा सांपडायचा नाहीं की ज्यात काव्य व अलंकार नाहीत. किंबहुना ज्याला काव्य व अलंकार यांचा अभ्यास करावयाचा आहे त्याने ज्ञानेश्वरी तोंडपाठ करावी." असो. चवथा गुण म्हणजे वकिलाची स्मरण शक्ति असली पाहिजे. अशिलाचे म्हणणे त्याला स्वतःला नीट सुव्यवस्थितरीतीने मांडता येत नाही म्हणून वकील घावयाचा असतो व या वकिलाची स्मरण शक्ति दांडगी असावी

लागते. शेवटला गुण म्हणजे उत्तम नटाचा अभिनय अंगी असावा लागतो. परंतु हे सर्व गुण समुच्चयाने असावे लागतात व तरच खरे वक्तृत्व अंगी बाणते. कोणताहीं एकच गुण असून भागणार नाहीं. नटवर्य बोडस हे जी भूमिका घेतात ती अत्यंत उत्कृष्ठ पण रंगभूमीवर चढवितात. परंतु त्यामुळे ते पहिल्या प्रतीचे वक्ते आहेत असे म्हणणें चुकीचे होईल. त्याच प्रमाणें वकील हे निरनिराळ्या वेळेस आशिलांची भूमिका विकत घेतात आणि आशिलाचे म्हणणे जे त्याला सांगतां येत नाहीं ते हे सांगतात तेव्हां वकिलांना वक्ते म्हणणे म्हणजे वस्तु स्थितीचा विपर्यास केल्यासारखे होईल....वक्तयानें बोलतांना भाषा शुद्ध वापरली पाहिजे स्त्रीचे केंस हे नुसतेच असले तर त्यांत शोभा नाहीं. त्यांना तेल लावून, विंचरून ते नीटनेटके ठेवले तरच त्यांत मजा आहे. नाहीतर "आज कोणता अवतार आहे." असे विचारण्याची पाळी येते. त्याच प्रमाणें वक्तृत्वासाठी प्रयत्न पुष्कळ करावा लागतो. जगाचे अत्यंत बारीक निरीक्षण करावे लागते, व जेथे काहीं चांगली गोष्ठ असेल ती पटकन् उचलून घेण्याची (चोरी करून नव्हे) शक्ति असावी लागते व ती अभ्यासानें येते. दागिना एकदम तयार होत नाहीं तर बाजारांतून अक्षरशः घासाघाशी करून ( कारण ते निकषावर घासावे लागते ) सोने आणावें लागते. ते सोनाराकडे नेऊन डोळ्यांत तेल घालुन त्याने चोरी करू नये म्हणून बसावे लागते. नंतर ठोकाठोकी करून तो दागीना घडवून मग तो ज्यांचे साठी करविला त्यांना संतोष वाटला की चीज झाले ह्याच प्रमाणें जगा

मध्ये निरनिराळ्या मंडळींच्या सहवासात नेहेमी वावरून सभोवारच्या परिस्थितीचे सूक्ष्म अवलोकन करून मग वक्तृत्व अंगी येत असते. जसा मधुकर ठिकाठिकाणचा मधु गोळा करतो व तो सुंदर असतो तसा अशा रीतीचा वक्तृत्वाचा हा मासला फारच मोहक असतो. वक्तृत्व बंद करा असे म्हणणे केवळ चुकीचे आहे. मागे १९२२ साली जी असहकारितेची लाट उसळली होती त्यावेळी पुढारी लोकांकडून खील हेच सांगत होते की "आतां भाषणे बंद करा," या म्हणण्यांत काही अर्थ नाहीं.

वक्तृत्वाचा चर्चा हा एक विभाग आहे, व चर्चा म्हणजे त्यांत दोन बाजू—पूर्वपक्ष व उत्तर पक्ष—असल्याच पाहिजेत असा काही नियत नाही. उलट ही पद्धत अतिशय घातुक आहे. (ता. ३०–१०–१९२० दिवशी) भावनगरला याच विषयावर माझा विद्यार्थ्यांशी वाद झाला. त्यांचे म्हणणे की कोणत्याही विषयाची उलट बाजू घेतल्याखेरीज चर्चा होऊं शकत नाही. पण हे साफ चुकीचे मत आहे. एकाने ब्रह्मचर्य हा विषय घेतला की दुसऱ्याने व्यभिचार हा प्रतिपक्ष जरी त्याला संमत नसला तरी चर्चेसाठी म्हणून घेतलाच पाहिजे. अशाने अत्यंत वाईट खोड लागते. माझिनी म्हणतो की "Man is a creature of education" मनुष्य हा संवयीने बनलेला आहे. व ही एकदां संवय लागली म्हणजे इंग्रजीत म्हण आहे की "Habit is second nature" त्या प्रमाणे तो दुसरा स्वभावच बनून जातो. असे वादविवाद कोणी करावेत? व्यास महर्षी सारख्यांनी

की ज्याची मते अगदी पुरी बनली आहेत व ती बदलण्याचा पुनः संभव नाहीं. परंतु ज्यांची मते अद्यापि बनतं आहेत, ज्यांना वक्तृत्व म्हणजे काय याचा अर्थ देखील पुरा माहीत नाही त्यांनी अशी चर्चा करणे हितावह नाही. एकाने बाजू सांगितली, दुसऱ्याने दुसरी सांगितली, तिसऱ्याने राहिलेली माहिती देउन त्याची पूर्तता केली तर हीं सुद्धां चर्चा या सदराखाली येउ शकते. उ गुलाबाचे फूल. एक म्हणतो काय फुलाचा रंग आहे ! ह्यामुळे गुलाब सुंदर. दुसरा म्हणतो छे छे. रंगामुळे नव्हे परंतु त्याला पाकळ्या असतात म्हणून गुलाब सुंदर. तिसरा म्हणतो, “ या दोन्ही कारणामुळे नव्हे परंतु ते मृदु आणि कोमल असते म्हणून. “ चवथा म्हणतो ” तसे नव्हे. ते सुवासिक असते म्हणून सुंदर. नंतर अध्यक्ष म्हणतात “ तुमच्या सर्वांचे म्हणणे बरोबर आहे. हे सर्व गुण गुलाबाचे फुलांत असतात म्हणूनच ते सुंदर. ही देखील चर्चाच होय. अमेरिकन प्रवाशांच्या अनुभवांतील ती बोराची गोष्टही याचेच उदाहरण होय. शेवटली महत्त्वाची गोष्ट म्हणजे सभेला अध्यक्ष हा पाहिजेच. कारण समर्थांनी दासबोधांत सांगितलेंच आहे कीं “ ज्याची सभा निनीयक तो एक पढतमूर्ख. ”



# गंभीर सूचना.

( कवि श्री. रामानंद. )

## फटका.

वितरुनिया यद्रुधिरबलि तुम्ही तोषवुनी राक्षसी रमा—
तिच्या प्रसादाने चालविला विलास निज निःशंकपणे ॥१॥
सत्तेच्या वारुणी मदें बेहद्द धुंद होऊनी बळे ।
तुम्ही कृतघ्नी पादतलीं जे दीन रगडिले आजवरी ॥२॥
न्याय निष्ठुर प्रभू आजिं त्यांच्या संचरुनी हृदयांत तया—
प्रेरित करण्या उग्र दंड; व्हा सावध लक्ष्मीं पुत्रांनो ॥३॥
वैभव तुमचे अखिल जयांच्या जिवांवरी चालले असे ।
त्यांच्या नाशा टपला तुमची भस्मासुरशीं कृती खरी ॥४॥
तुमच्या क्रूर स्वार्थने अन्नान्न करुनि जे तडफडले ।
कामांधाधत्वाने तुमच्या ज्या दीन भ्रष्ट सती झाल्या ॥५॥
मदांध तुमच्या संचाराने चिरडुनि गेली जी बाले—
मृत्युमुखीं निःसत्व होउनी, हाय ! अकालिंच जीं पडली ॥६॥
त्या सर्वांच्या महा भयंकर किंकाळ्या पोंचल्या अता—
परमेशाच्या द्वारिं; जाहला सज्ज शासना तुमच्या तो ॥७॥
वेळिंच पश्चात्तापा पावुनि निज पापांच्या निष्कृतिचे ।
प्रायश्चित्ता घ्याल नच जरी-समजा कठिण गती झाली ॥८॥

## गंभीर सूचना.

ज्यांच्या अस्थिच्या पायावर उंच हवेल्या तुह्मि केला ।
ह्या अस्थी मधिं प्राण दिसत रे उखडुनि जातिल त्या आता ॥९॥
क्रांतीची पातली भयानक वेला मज दिसते स्पष्ट ।
जागे जरि नच व्हाल समयिंया—जाणापुरती अधोगती ॥१०॥
अधिकाऱ्यानो निज सिंहासनतलीं रावणापरी तुम्ही ॥
कोट्यवधी जनता—देवातें राखाया करिता यत्न ॥११॥
स्वातंत्र्याची ज्योत पेटली हृदयिं तयांच्या परिं आता ॥
भस्म करिल दाबाल जरि तुम्ही जाणुनिया आजि सावध व्हा ॥१२॥
पश्चिमे देशामधीं भडकला एकवार दावाग्नि महा ॥
त्याची येथे पुनरावृती होणारचि हे मनिं समजा ॥१३॥
दाहि दिशा गंभीर जाहल्या तुफान उठले प्रचंड हे ।
अफाट दरिया घोर माजला खवळलि पंच महा—भूते ॥१४॥
सांभाळुनि जरि या समयीं नच हकाल अपुल्या नौकेतें ।
लोकक्षोभाच्या खडकावरि फुटुन तिचे होतिल तुकडे ॥१५॥
हृदय उसळते कोपें स्मरता जुलमी तुमची नीच कृती ।
सर्वोचि वाटत दयामनामधिं आत्मबंधु ह्मणुनी तुमची ॥१६॥
म्हणुनि करित 'गंभीर सूचना' सावधव्हा; ना तरि जाणा ।
ईशाज्ञेनें ठाकत 'रामानंद' सज्ज तुम्हां पुढतीं ॥१७॥

मे १९२८.

---

# बँके विषयी सामान्य माहिती.

( ले. श्री. शं. कृ. गोवंडे ).

आज काल आपण जिकडे तिकडे बँके संबंधी ऐकतो पहातो आणि वाचतो, परंतु तिच्या कार्या संबंधीची पुरेशी माहिती मिळविण्याची बहुतेकास जिज्ञासा नसते, एवढेच नव्हे, पण कित्येकास हे काही गौड बंगाल च आहे, असे वाटते, अशी स्थिती बहुतेक मध्यम वर्गातील मंडळींची आहे. मग अडाणी अशिक्षित, लोकां संबंधी कांय म्हणावे ? सहज रस्त्यावरून जात येत असता एखादी बँकेची कचेरी दिसली तर कै. हरीभाउ आपटे यांच्या 'पण लक्षांत कोण घेतो, या कादंबरीतील ' धी बिग् बबऱ् बेंकिंग ब्यूरोचे वर्णन साक्षांत समोर उभे राहिल्या सारखे वाटते. ती लड्ठे पुस्तके, चकचकीत पितळेचे गज लावलेल्या खिडक्या, नोटांचे पुडकेच्या पुडके, रुपयांच्या थैल्यांचा ढीग वगैरे थाट पाहिल्यावर दुसरे काही मनात न येतां कै हरीभाऊंच्या वर्णन शैलीचीच तारीफ करावीशी वाटते. यदा कदाचित् कोणी एखादा गृहस्थ बँकेचा कैवार घेऊन काही म्हणालाच तर त्याला दुसरा मनुष्य ( साधारण सुशिक्षित असेलतर ) " फूलस् मनीं ॲन्ड वाअिझेस बॅन्क " असाच रोकडा जबाब देईल. आणि यदा कदाचित तो सुशिक्षित नसलाच तर' लोभी ब्राह्मण

आणि ढक यातलाच हा सुधारुन वाढविलेला प्रकार आहे असे ह्मणेल. वास्तविक पहाता लोकमत अगदीच वेडगळ-पणाचे आहे, असे नाहीं कारण आपल्या देशांत सुमारे २५-३० वर्षांपूर्वी ज्या बँका निघाल्या आणि थोडयाच दिवसाच्या अस्तित्वा नंतर लुप्त झाल्या त्यामुळेच अशा प्रकारचे मत होणे अगदी साहाजिक होते पण लक्षांत ठेवण्या जोगी गोष्ट ही की या ज्या बँका बुडाल्या त्यांतिल वहुतेक काही अंशी लोकाच्या आश्रयाच्या अभावी तर काही अंशी त्यांच्या अज्ञाना मुळे बुडाल्या.

बँकेच्या धंद्यासंबंधींचे तत्त्व आपणास अगदी नवे आहे असे मुळीच नाहीं. जर आपल्या देशाची सुधारणा आणि व्यापार फार प्राचीन काळचा आहे असे ह्मणावयाचे असले तर बँकेच्या कार्याचीहि सुरुवात त्या बरोबरचीच आहे असे ह्मणणे प्राप्त होईल. गांवोगांवी आणि दरेक व्यापारी पेठेवर आपण मारवाड्यांची दुकाने व सराफी पेढया पहातो त्याचे कार्य आणि बँकेचा व्यवहार या मध्ये सर्व तोपरी साम्य आहे. फरक एवढाच की सराफ किंवा सावकार हे शेकडो वर्षां पासून चालत आलेल्या पद्धतिने व्यापार करतात, तर बँका आधुनिक व्यापारी पद्धतिला अनुकूल पडेल अशा रीतिने आपले स्वरूप ठेवतात.

हल्ली आपण ज्या पद्धतिच्या संस्थेला बँक ह्मणतो तशा प्रकारच्या बँकेची सुरवात इंग्लंड मध्ये सन १६९४ सालीं ह्मणजे श्री शिवाजी महाराजा नंतर थोडया वर्षांनी ‘ धी बँक ऑफ इंग्लंड ’ या नांवाच्या

बँकपासून झाली. या पूर्वी बँकेची काही कार्ये सोनार करीत असत, हीं बँक आज जगात मोठयात मोठी आणि अतिशय प्रतिष्टित ह्मणून समज़ली जाते. या वेळी इंग्लंड देशांत राजा तिसरा विलयम हा राज्य करीत होता. त्याच्या कार्किर्दित इंग्लंड युरोपांतील राष्ट्रांशी लढत असलयामुळे पैशाची टंचाई फार भासूं लागली. अशावेळी राजाच्या सल्लादारांनी त्यास वरील बँकेची कल्पना दिली, सुरवातीस बँकेचे मांडवल १२०००० पौंड होते व ते सर्व सरकारला कर्जाउ देण्यांत आले व त्याबद्दल बँकेस इतक्या पौंडाच्या नोटा काढण्याचा हक्क देण्यात आला. या बँकेचा आज पर्यंतचा इतिहास फारच मननीय आहे. पण जागेच्या अभावी या बद्दल अधीक लिहिता येणे शक्य नाहीं.

शास्त्रज्ञांनी बँकेची व्याख्या अशी केली आहे कीं, जी संस्था ज्यांच्या जवळ कामा पेक्षा जास्त पैसा आहे त्यांचा तो पैसा लागेल तेव्हां परत करण्याचा शर्तीने ठेव ह्मणून ठेवते आणि ज्यांचे जवळ पुरेसा पैसा नसतो त्यांना व्याजावर कर्ज ह्मणून देते, कोणत्याहि,—समाजांत तो कितीही मागासलेला असला तरी त्याच्यांत असे नेहमी लोक सापडावयाचे की ज्यांना आपले जवळील पैशाचे तात्पुरते काय करावे हे समजत नाही, व ज्यांना आपल्या जवळ आहेत त्या पेक्षां अधिक पैसे थोड्या वेळासाठी कोठून मिळतील याची चिंता वाटत असंते अशी स्थिति असतांना अगदी स्वाभाविकपणे एक जण किंवा काही जण पुढे येतात की जे वरील दोन्ही प्रकारच्या लोकाशी

मध्यस्थी करून दोघांच्या गरजा भागवितात अशाच मध्यस्थी मंडळींना बँक ही संज्ञा देण्यात येते. ज्या प्रमाणे शहरातील माणसांना धान्य लागल्यास ते शेतकऱ्या जवळ न जाता धान्याचा बाजारांतच जातात, आणि शेतकऱ्यांना धान्य विकावयाचे असल्यास तेही आपला माल बाजारांत आणून धान्याच्या व्यापाऱ्याला विकतात आणि मग लोकांच्या आणि शेतकऱ्यांच्या अशा दोन्हीं गरजा व्यापारी भागवतो त्याच प्रमाणे बँकेचेही काम असते. या ठिकाणी असे कोणी ह्मणेल की या कामासाठी मध्यस्थी करावयाला बँकेची काय जरूरी आहे ? तर त्यास हेच अत्यंत सयुक्तिक उत्तर होईल की ज्या सोई साठी शेतकरी आपला माल घरोवरी न विकता बाजार पेठतील व्यापाऱ्यास विकतो, आणि गिऱ्हाईक आपल्या महिन्याच्या पुरवठ्या साठी शेतकऱ्याकडे न जाता बाजारांत जातो त्याच सोई साठी बँकेची मध्यस्थी अत्यंत जरूरीची आहे. वरील विवेचना वरून बँक आणि इतर जिनसांचे व्यापारी यांच्या मधील व्यवहाराचे सादृष्य दिसत असले तरी या दोघांच्या कामात एक सुक्ष्म पण फार महत्वाचा भेद आहे. तो आसा कीं, व्यापारी आणि शेतकरी किंवा काररवानदार यांच्य मधील व्यापार माल आणि त्याची किंमत पैसा अशा प्रकारे असतो, तर बँक आणि तिचे गिऱ्हाईक यांचे मधील देवघेव पैसा आणि त्याची किंमत हीं पैसाच अशा रितीची असते.

ज्या प्रमाणे इतर कोणत्याही व्यापारांत भांडवल ह्मणून स्वतःची अशी काही तरी रक्कम लागते त्याच प्रमाणे बँकेलाहि भांडवल लागते,

हल्ली आपल्या ऐ.किवात येणाऱ्या सर्व बँकांची सुरुवात समाईक भांडवलाने झालेली आहे. मुंबई किंवा अमदावाद येथील गिरण्यांचे भांडवल ज्या पद्धतिने जमविण्यात आले तीच पद्धत बँकेचे भांडवल उभारण्यांत आलेले आहे. तेव्हा या संबंधी विशेष विवेचनाची गरज नाही.

थोड्याशा पैशाने मनुष्य व्यापार करावयास लागला की ज्या प्रमाणे काही दिवसानी त्यास उधार माल मिळूं लागतो व अशा रितीने—त्याची व्यापार करण्याची शक्ती वाढते, त्याच प्रमाणे बँकेने आपली कचेरी उघडली की ठवीदार आपल्या ठेवी व्याजावर आणून ठेवावयास लागतात. अर्थात या ठेवी आणि भांडवल यांच्या बळावर बँकेची सर्व मदार असते.

बँकेच्या ठवीदारांचे निरानिराळे सोईवार वर्ग केलेले असतात. ज्यांना वारंवार पैसे काढावे लागतात किवा ठवाव लागतात त्यांच्यासाठी चालू खाते असते, ह्या खात्यांतील ठवदिरास चेकच पुस्तक देण्यात येते, खात्यातील पैसे काढावयाचे असतात तव्हा तेवढ्या पैशाचा चेक द्यावा लागतो.

चेक ह्मणज बँकेवर काढलेली दर्शनी हुंडीच होय, प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्रात चेकचा उपयोग मनस्वी होतो. आपल्या दशांतही आता चेकने पैसे देण्याघेण्याचा प्रचार वाढत चालला आहे. चकचा इतका प्रसार होण्याला मुख्य आणि एकच कारण ह्मणजे त्याचे अनेक गुण हे

होत. चेकचे पुस्तक असले ह्मणजे ज्या ज्या वेळी कोणास पैसे द्याव-याचे असतात त्या त्या वेळी चेक देणे सुलभ पडते. एक तर घेणाऱ्या देणाऱ्यास पैसे मोजावे लागत नाही. तसेच पैसे घेणाऱ्या मनुष्याची पावती रहाते. कारण जेव्हां चेकचे पैसे घेण्याला मनुष्य बँकेत जातो तेव्हां पैसे मिळण्यापूर्वी त्यास त्याच्या पाठी मागे सही करावी लागते ही सही पावती ह्मणून कोर्टांत सुद्धा समजली जाते. ज्याच्या जवळ चेक आहे, आशा मनुष्याला दुसऱ्या कोणास पैसे द्यावयाचे असतील तर तो चेकच्या मागे अमुक मनुष्यास पैसे द्यावे असे लिहून खाली सही करतो, ( अशा प्रकारच्या लिहिण्यास इंग्रजीत अेन्डॉर्समेन्ट असा शब्द आहे ) या मुळें ज्या बँकेवर तो चेक असतो ती बँक नांव लिहिलेल्या मनुष्यास पैसे देते, या प्रमाणें एकच चेक अनेक मनुष्यांच्या हातून जाऊ शकतो. एखाद्या मनुष्या जवळचा चेक हर-वलाच तर दुसऱ्या कोणास त्याचे पैसे मिळूं नये अशी व्यवस्था करण्यात येते. अशावेळीं चेकचा मालक चेक लिहिणाऱ्या मनुष्या जवळ जाऊन त्याने काढलेलया चेकचे पैसे देऊं नये असें बँकेस लिहितो. परगांवी पैसे धाडावयाचे असलयास चेकने ते पाठविता येतात, यामुळें पोष्टाने मनी ऑर्डर धाडण्या पेक्षां कमी खर्च येतो. चेक बँकेला दाखविल्या बरोबर बँकेला पैसे देणे भाग असते, ह्मणजे देणारा देतो व कोठावळ्याचे पोट दुखते असे अगदी होत नाही. हा चेकचा खरोखरीच फार मोठा फायदा आहे.

वरील सर्व गोष्टी असल्या तरी येवढे मात्र सोडून चालावयाचे

नाहीं की चेक लिहिणाऱ्या मनुष्याच्या खात्यांत पैसे जमा असावें लागतात तसेच तो बरोबर व संपूर्ण भरला पाहिजे. या गोष्टी जर अनुकूल नसलया तर अर्थात पैसे घेणाऱ्यास फुकट त्रांस मात्र होतो.

काही लोक असे असतात की ज्यांना वारंवार पैसे काढावे किंवा ठेवावे लागत नाही. ही मंडळी मुदती वर पैसे ठेवतात आशा खात्या-वर व्याजही जास्त मिळते. याला कारणे उघडच आहेत. या खात्यांत ५०० रु. किंवा त्या पेक्षां जास्त रक्कम घेण्यात येते.

या शिवाय आणखी एक खाते असते याला सेव्हींग्स बँक ह्मणतात. याखात्यात कमी रक्कम ( ४ आण्यापासून ) घेण्यांत येते व वाटेल तेव्हां—पण आठवड्यांतून एकदाच—पैसे काढता येतात. या खात्यावर मुदतीच्या ठेवी पेक्षां थोडे कमी व्याज मिळतें, कारण ल्हान रकमेवरहि व्याज देण्यांत येतें, व ठेवीदारास वाटेल तेव्हां पैसे काढण्यास मुभा असेत.

वरिल वर्णनावरून असे कळून येईल की बँके जवळ जो खजीना असतो तो मुख्यत्वे भांडवल आणि लोकांच्या ठेवी यांचा बनलेला असतो.

आता, भांडवल आणि ठेवी यांचा बनलेला हा मोठा निधी कशा रितीने फायद्यास लावता येतो, हें सांगावयाचें आहे. उपरोक्त वर्णन केल्या प्रमाणे, ठेवींच्या मानाने भांडवलाची काहीशी कमी महत्वाची बाब सोडली तर आपणास असे दिसुन येईल की लोकांच्या

ज्या ठेवी असतात त्यातल्या बहुतेक लोकांनी मागितल्या बरोबर परत करण्याच्या बोलीने ठेवलेल्या असतात. अर्थात, ही अट केव्हांही पाळता यावी अशा संधानानेच बँकेला आपला पैसा लावावा लागतो, नाही तर लोकांनी पैसे मागितल्याबरोबर त्याचवेळेस परत करता आले नाहीत तर बँकेची मोठीच बेअब्रू व्हायची. म्हणून आपण जो पैसा लावूं तो केव्हां परत येईल, वेळेवर परत येईल किंवा नाही, याचा बरोबर अंदाज बांधून मगच बँक आपल्या हातचा पैसा सोडते.

बँकेच्या निधीतला बराच मोठा भाग कर्जाऊ दिलेला असतो. उसनवार रक्कम मागणाऱ्यापैकी बहुतेक सर्व व्यापारी वर्गातले असतात. व्यापाऱ्यांचा धंदा बहुतेक उसनवार पैशावर चालत असल्यामुळे त्यांना वारंवार कर्ज काढावे लागते व ते बँकेतून मिळते विशेष करुन लक्षात ठेवण्या सारखी गोष्ट ही की इतर लोकांपेक्षा व्यापारी वर्गाशीच बँकेचे चांगल्या रितीने जमते याचे कारण बँकेला आपला पैसा फारवेळ गुंतून राहूं नये याची वाटत असणारी काळजी हे होय, व्यापाऱ्याचा धंदा म्हणजे माल घेणे व त्याचा पैसा करणे, पुन्हा पैशाचा माल घेणे व पुन्हा त्याचा पैसा करणे, असा असल्यामुळे व्यापाऱ्या जवळ नेहमी पैशा ची ये जा चाललेली असते, तेव्हां बँकेने व्यापाऱ्यास कर्ज दिल्यास थोड्याच वेळांत लागल्यास तिला ते परत मिळण्याचा पुष्कळ

संभव असतो. या वरून वाचकांना असे स्पष्ट कळून येईल की बँकेशी संबंध ठेवणारे बहुतेक व्यापारी वर्गांतले असतात.

आपल्या देशांत अजून शेतकरी वर्गाशी संबंध ठेवणाऱ्या बँका फार थोड्या आहेत. याचे कारण येथील शेतकी व शेतकरी यांची स्थिती बरी नसून एकदा दिलेले पैसे विशेष अडचण न पडता परत वेळेवर मिळण्याची धास्ती वाटणे हे होय. शेतकऱ्यांच्या उपयोगी पडतील अशा बँका जरा निराळ्या पद्धतीच्या पाहिजेत ह्मणजे त्यांना लांब मुदतीच्या ठेवी मिळून दिलेले कर्ज कमी जास्त वेळाने परत आल्यास अडचण होऊ नये. या शिवाय मध्यम वर्गांतील ह्मणजे विशेष करून कारकुनी पेशांतील मंडळींसाठींही आपण वर्णन करीत आहो अशा प्रकारच्या बँका उपयोगी नाहीं; याचे कारण कारकुनांना लागणारे कर्ज फार ल्हान असते व एकदा रक्कम दिल्यास ती सर्वच्या सर्व एकाचवेळीं परत मिळणे कठीण असते. अशा रकमा हप्त्यानेच घ्याव याच्या असतात. उदाहरणार्थ, एक गिरणीतला कारकून आहे व त्याला, समजा लग्न करण्याची इच्छा आहे किंवा त्याला त्याच्या मुलाची मुंज करावयाची आहे व अकंदर ४०० रुपये पाहिजे आहेत. आता जर या मनुष्याला ४० सच रुपये पगार असला तर त्याने कर्जाऊ काढलेली ४०० रुपयांची रक्कम एकदम कशी फेडावी? तेव्हां फार तर दरमहा १५ रुपये हप्त्याने भरण्या शिवाय सोय नाहीं, अशा रितीने ४०० रुपये भरण्यास त्याला २७ महिने लाग-

तील. तेव्हां व्यापारी बँकेला इतकी लहान रक्कम परत घेण्याला किती त्रास व वेळ लागेल. अर्थात अशा मध्यम वर्गांतील लोकांच्या सोई साठी निराळ्या पद्धतीची संस्था पाहिजे. अशा प्रकारच्या संस्था दिवसें दिवस आपल्या देशांत अधीक प्रमाणावर निघत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. अशा प्रकारच्या संस्थेचे उदाहरण द्यावयाचें तर, टेलिग्राफ-को-ओपरेटिव्ह क्रेडीट सोसायटी हीचे देता येईल.

आतां बँक पैसे कर्जाऊ देते त्यावेळी कशाच्या जोखमी वर तिची नजर असते हे पाहणे अवश्य आहे. जर पैसे मागणारा मनुष्य श्रीमंत, तसाच अब्रुदार असेल तर त्यास नुसत्या त्याच्या वचन पत्रावर पैसे मिळतील कारण त्याला दिलेले पैसे परत मिळवावयाला बँकेला मुळीच तस्दी पडावयाची नाहीं, या ठींकाणा आमचे काही वाचक शंका काढतील कीं असा श्रीमंत मनुष्य बँके जवळ कशाला याचना करावयास जातो ? तेव्हां थोडे स्पष्टीकरण करणें प्राप्त आहे, जेव्हां मनुष्याला पैशाची गरज पडते त्यावेळीं त्यास रोकड नाण्यांची गरज असते मनुष्य कितीही श्रीमान असला तरी त्याच्या जवळ पुष्कळशी रोकड शिल्लक असणे अगदी अशक्य असते कारण ज्यावेळीं अशी रक्कम येते त्यावेळी तो काहीतरी विकत घेण्यांत खर्च करतो. उदाहरणार्थ, सोनेच विकत घेऊन त्याचें दागिने करवतो किंवा मोटार खरेदी करतो तेव्हा खर्चाचा प्रसंग आलयास, किंवा व्यापाऱ्याच्या बाबतीत खरेदी करण्याची वेळ आली ह्मणजे त्यास कर्जच काढावे लागते तुह्मी जरी सोन्याचे घडयाळ वापरत असला किंवा सोन्याची आंगठी

किंवा सोन्याची बटणें घालत असला आणि एखादे महिन्यास तुह्मास थोडा अधीक खर्च करण्याचा साधारण प्रसंग पडला तर तुह्मी आपले मौलयवान चिजा कधींहि विकणार नाहीं, फार तर शेजाऱ्या पाजाऱ्या पासून उसने रुपये काढून वेळ भागवाल. याच प्रमाणें श्रीमंत मनुष्य व्यापारात पैशाची थोडी अधीक गरज पडल्यास आपली मोटार विकणार नाहीं, किंवा आपले राहते घर विकणार नाही.

ज्यांच्या श्रीमंती संबंधी लोकांत विशेष माहिती नाही, आणि ज्यांच्या सचोटी बद्दलही काही माहिती नाही असे लोक बँके जवळ कर्ज मागावयास आले तर त्यांना काही तरी मिळकत गहाण ठेवावी लागते. या ठिकाणी पुन्हा तीच गोष्ट ध्यानांत ठेवावयाची आहे की गहाण ठेवायची वस्तु अशी पाहिजे की ती वेळ पडल्यास थोड्याच त्रासांत व वेळांत विकली गेली पाहिजे. कोणत्या गोष्टी गहाण स्विकारायला बँक तयार असते व त्यांचे सविस्तर वर्णन देणे कंटाळ वाणे वाटेल ह्मणून ऋणको पैसे फेडावयास दिरंगाई करु लागला की थोड्याच वेळात व खर्चात कशाचे पैसे उभे होतील या गोष्टीकडे लक्ष ठेवून पुढे दिलेल्या मिळकतीच्या प्रकारांची चर्चा. वाचकानी आपल्याशी करावी. शेत, शहरातील हम रस्त्या वरील घर, कापडाचे व कापसाचे गठ्ठे, गिरणी, समाईक भांडवाली मंडळ्यांचे भाग, सरकारी कर्जरोखे व वचन पत्रे कोणत्याहि बँकेच्या वार्षिक जमा खर्चाचा खर्डा घेतला तर आपल्या ताबडतोब लक्षांत येईल की खर्चाच्या बाजु-कडे मोठ्यांत मोठी बाब ह्मणजे लोकांना दिलेले कर्ज, ज्या अर्थी

## बँके विषयी सामान्य माहिती.

उसनवार पैसे देणे व घेणे हा बँकेच्या धंदाचा मुख्य भाग आहे त्या अर्थी असा प्रकार असणे उघड आहे.

यानंतरची बाब ह्मणजे रोजच्या व्यवहारा खेरीज आणि कर्जाऊ दिलेल्या रकमे खेरीज जी काही बरीच मोठी रक्कम असते तिचा व्यय होय. ही उरलेली रक्कम कोणच्याना कोणच्या उपयोगात आणल्या शिवाय चालत नाही. कारण नुसती तिजोरीत ठेवून दिलीतर त्यावरील व्याजाचे नुकसान होते, बरे, कर्जाऊ दिली आणि एखादवेळीं पैशाची अधीक मागणी आली तर एकदम ती परत मिळावयाची नाही. ह्मणून ही रक्कम अशीच वापरावी लागते की वाटेल तेव्हां अर्ध्या रात्री हातास लागेल, आणि शिवाय तिच्यावर व्याजहि सुटेल, ह्मणून अशी रक्कम बँक सरकारी आणि निम सरकारी कर्ज रोख किंवा वचनपत्र आणि पेढ्या प्रतिच्या मंडळ्यांचे भाग खरेदी करण्यात वापरेत.

आता शेवटची बाब ह्मणजे रोजच्या व्यवहाराला लागणारी रोकड ही होय. महिन्याचे काही दिवस आणि वर्षाचे काही महिने असे असतात की त्यावेळी पैशाची मागणी अधीक असते. बँकेच्या व्यवस्थापकाला या मागणीचा अंदाज रात्रंदिवस बांधावा लागतो आणि यावरच त्याची बरीचशी हुशारी अवलंबून असते.

मार्च १९२६.

---

# दीप आणि चंद्र.

( रचनाकार-श्री. वि. मा. देशपांडे ).

दीपा मूर्ती तुझी किती ।
ज्योत लहानी त्या वरती ॥
धूम्र धांवे सैरावैरा ।
गृहा आणितो कृष्णकळा ॥
कार्यक्षेत्र ते अल्प तुझे ।
किती विशाल परी माझे ॥
ज्वाला मंद त्वद्, दाहक ।
असे असोनी कितीयेक ॥
पतंग वरुनी
पडे तुटोनी
जात मरोनी
तुझ्यावरीं का मोह पडे ?
इतुका सगळा सांग गडे ॥१॥
प्रश्न श्रवोनी शशिचा त्या ।
उत्तरला तो दीप तया ॥

स्वयं प्रकाशित तूं नाही ।
किंमत जन ना दे काही ॥
मृत्यु लोकिचा न्याय असा ।
स्वये प्रकाशुनि कुठे बसा ॥
जनता येवुनिया तेथे ।
मना सारिखे गौरवते ॥
तैल पदरचे पीवोनी ।
स्वयें धेत मी दग्धोनी ॥
जळत वा तेज देवुनी ।
परोपकारी मी मरुनी ॥
तुझ्यातं असे
वा काय वसे
तूं दूर दिसे
स्वयें दग्धुनी मी जगतीं ।
राही म्हणुनी हे येती ॥२॥

अनुष्टुप वृत्त.

प्रकाशावे कोणिही ह्या जगतीं अपुल्या बळे ।
कार्यार्थ अर्पिता प्राण जनांत नांव होतसे ॥३॥

जानेवारी १९२८.

# विचार तरंग.

( संपादकीय. )

हिंदुस्थानची भविष्यकाळची मदार हल्ली असलेल्या सर्व तरुणांवर व तरुणींवर आहे. तरुणांच्या उड्या नेहमी भयंकर किंवा साहसी असल्या पाहिजेत. त्याचप्रमाणे, हल्लीच्या मुली म्हणजे भविष्य कालीन वंदनीय माता, यांचे विचारही तरुणानां पुष्टि देणारे असले पाहिजेत. आपणाला महाप्रतापी, रामचंद्रासारखा पुत्र व्हावा अशी ह्यांची इच्छा असली पाहिजे. रात्रंदिवस देवाजवळ प्रार्थना करतांना ' पुत्रव्हावा ऐसा गुंडा ज्याचा तिन्ही लोकीं झेंडा ' असा पुत्र दे म्हणून त्यांनी मागणी करीत जावी. उदरांतूनच ज्या वेळी पुत्र अभिमन्यु प्रमाणे देशभक्तीनें मुसमुसलेले निपजतील त्यावेळी भारत राष्ट्र काय, भारत धर्म काय, वर येण्यास किती वेळ लागेल? गर्भांतूनच जे पुत्र देश-भक्तीचे शिक्षण घेऊन येणार त्याना पाश्चात्य शिक्षण कितीसे गुलाम करणार?

*     *     *     *

हल्लींच्या तरुणांची आणि तरुणींची स्थिती फारच खेदकारक झाली आहे. कारण, त्यांना बाल्यावस्थेतून प्रौढावस्थेत आल्या बरोबर पोटोबाची फार काळजी पडते. तेव्हां तरुण वयांतच २००–३००

रुपयाचा कामगार किंवा एकाद्या सेक्शनचा हेडक्लार्क (वरिष्ट कारकून) होण्याची तो इच्छा करतो. परंतु अशा इच्छांचा नायनाट करण्याचे काम समजूतदार भगिनीवर असते; पण सुशिक्षित भगिनी वर्ग हे कर्तव्य बरोबर बजावीत नाही, तर उलट नोकरीच्या इच्छेला पोषण देणाऱ्या विचारांचे आलाप कधी कधी बाहेर पडतात. आणि तेही केव्हां ? तर मंगला गौरीच्या मंगल रात्रीं—की जी रात्र गौरीचे चिंतन करण्यांत, तिच्या लीलांचे वर्णन करण्यांत, गाणी म्हणण्यात घालवावयाची ती मंगल रात्र नुसत्या मनसोक्त हंसण्या खिदळण्यांत घालविली तर काय उपयोग ? अशाह्या मंगल रात्रीं--

तुझा भाऊ कसा, माझा भाऊ कसा ।
कानांत लेखणी कारकुन जसा ॥

असे उखाणे म्हणत घालविली म्हणजे त्या समोरच्या गौरीं मातेस काय वाटेल ?

अशा तऱ्हेचे बहकलेल्या तरुणींचे बहकलेले विचार ऐकून समोर बसलेल्या मंगलागौरीस किती खेद होत असेल बरे !

वर सांगितलेले तरुणींचे आलाप ऐकून आपल्या भारत माउलीस काय वाटत असेल ? तिला खचित वटित असेल की अद्यापि दोन तीन तप तरी गुलमगिरिचें ग्रहण सुटत नाहीं. मराठयांचें राज्य असावे असें डोहोळे लागणाऱ्या जिजामाउली कोठें, आणि रामायणादि ग्रंथ वाचूनही सुशिक्षित म्हणविणाऱ्या, भविष्य कालीन माता, ' कार-

कुन जसा ' घोंकणाऱ्या मुली कोणीकडे ? झांशीची राणी कोठे आणि हल्लीच्या विदेशीं मालास भुलणाऱ्या भगिनी कोठें ?

*　　*　　*　　*

पर्जन्यवृष्टी भयंकर झाली म्हणजे ओढे, नाले, पाण्याने फुगलेले दिसतात; कृष्णा, तापी, नर्मदा सारख्या मोठ्या नद्या पाण्यानें ओत-प्रोत भरलेल्या असतात; अगदी प्रथम मुसळधार पाऊस पडला असता अगदी पहिल्या महापुराच्या येणाऱ्या लोंढयाने कधी कधी फारच नुकसान होते. अतिशय उन्हाने तापलेला प्रदेश, अहमदाबादच्या साबरमति कांठची जाळू की पोळू करणारी वाळू, एकच महापुराचा लोंढा शांत करुन रुक्ष भासणाऱ्या निसर्गाची शोभा एकदम थंड करतो आणि प्रेक्षकांस भीति उत्पन्न करतो. अस्तु. ह्या लोंढयात किती नुकसान होते हे काही कादंबरी प्रमाणे वर्णन करण्याचे हे स्थळ नव्हे, तरी पण, त्याची कल्पना सूज्ञ वाचकांस आली असेलच. त्याच प्रमाणे, देशावर देशभक्तीच्या प्रेमाची वाग्वृष्टी होते त्यावेळी सुद्धां असेच भयंकर पूर येत असतात, आणि कल्पनातीत नुकसान होते. अशारीतीचे पूर नेहमी परदास्यांत गांजलेल्या देशात विशेषें-करुन येतातच. नेहमी पर्जन्यवृष्टीचा उपयोग जीवनार्थ होतो; एक वर्षी जर पाऊस पडला नाही तर जिकडे तिकडे हाहाःकार होतो, व लोकांच्या तोडंचे पाणी पळतें. तद्वतच देशप्रेमाच्या वाग्वृष्टीचा सुद्धां देशजीवनार्थ उपयोग होतो. देशभक्तीच्या वृष्टीने देशभक्तांचे पीक येते आणि देशभक्तांचे पीक चांगले आले म्हणजे देशांत कीर्तिमुख

वाहून आबादानी होते. अशा तऱ्हेचे देशभक्तिचे महापूर ग्रीस, अमेरिका, इटली ईजिप्त, अयर्लंड वगैरे देशांत येऊन गेले. जो पावेतों ही वृष्टी झाली नाही, तोपावेतो ते देश परदास्याच्या प्रखरतेने अगदी होरपळून गेले. आयर्लंड तर पार करपून गेले होते. १९२४ साली त्याचे पुनरुज्जीवन झाले.

आज शेसवाशे वर्षे झाली, हिंदुस्थान असाच परदास्य—उग्रतेने होरपळून गेला आहे, तरी पण अद्याप वर्षाऋतु येत नाही; येत नाही म्हणण्यापेक्षा तो कितींदा कोरडा गेला हें सांगता येत नाहीं. आमच्यावर ईश्वरी कोप आहे असेच म्हणणें भाग पडतें. मधून मधून ढग चांगले येतात, पण झंझावाताच्या दडपशाहीने ओसरू लागतात. कधी कधी अतिवृष्टीही होते, व १९०८ सालचे पुनरागमन होतें की काय अशी भीति वाटू लागते. १९०४ साला प्रमाणे १९२४ साली बंगालमध्यें क्रांतिपूर येणार अशी दाट वंदता होती. १९२० पासून ते १९२३ पर्यंत देशपरिस्थितीचे आकाश इतके भरलेलें दिसत होते की, हा पाऊस पडल्यास न भूतो न भविष्यति असा प्रकार होईल असे वाटले होते. पण पाऊस पडेल तेव्हां ना ? शाळा कॉलेजे सोडून भटकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मेघगर्जनेने, वकीलीवर स्वतः पाणी सोडलेल्या वकिलांच्या विद्युत्प्रकाशाने, आणि कोर्टावर पडलेल्या बहिष्काराच्या कडकडाटाने आकाश दुमदुमून गेले होते. सरकारची तर पांचावर धारण बसली; परंतु बारडोलींच्या एकाएकी सुटलेल्या झंझावाताने सर्व ढग पार ओसरले, व पुराची जी भीति वाटत होती

ती पार नाहींशी झाली. मात्र ह्या पिच्छे हाटीने देश जितका लवकर पुढे गेला होता तितकाच मागे आला. आमच्या ह्या अभागी हिंदुस्थानात देशभक्तीचा पूर केव्हा येईल, आणि येथे स्वातंत्र्याची केव्हा आबादानी होईल, हे फक्त त्या विधात्यालाच माहीत.

*       *       *       *

आम्ही आज पर्यंत फंड गोळा करण्या करिता पुष्कळ हिंडलो. आम्हांला समाज निरीक्षण करण्याची अत्यंत हौस असल्यामुळे फंडाच्या कारणाने नाना त-हेच्या मंडळीस भेटण्याच्या प्रसंग आला. मुंबईस असताना ग्रँटरोड आणि गिरगांव मधील प्रत्येक चाळ हिंडून, ह्या भागातील प्रत्येक वकिलाजवळ जाऊन, प्रत्येक सॉलिसिटरकडे जाऊन, प्रत्येक डॉक्टराला भेटून आम्ही स्वतः हिंडून नाना तऱ्हेचे अनुभव मिळविले आहेत. ह्या समाज निरीक्षणाच्या दौऱ्यात आमच्या असे अनुभवास आले की डॉक्टर आणि मध्यम प्रतीचे लोक जितकी कळकळीच्या ओलीची सहानुभूति दाखवितात तितकी नुसती कोरडी सहानुभूति सुद्धां आमच्या वकील मंडळींकडून मिळत नाही. परंतु भांगेत सुद्धां कधी क्वचीत तुळस उगवते, दैत्याच्या कुलात सुद्धां ज्या प्रमाणे एखादा प्रल्हाद निपजतो, त्या प्रमाणे वकिलीच्या धंद्यात सुद्धां एखादे देशबंधू दास आणि एखादे महाराष्ट्रीयांची अभिमानाने कळकळ बाळगणोर गणेश वासुदेव मावळंकर ऊर्फ दादासाहेब मावळंकर निपजतात, असे अहमदाबादच्या समाज निरीक्षणावरून कळून आले.

*       *       *       *

श्री. दादासाहेब मावळंकर यांनी नगरच्या 'अनाथ विद्यार्थी गृहाला' शंभर रुपये दिले. ही ह्यांची दातृत्व शक्ति वाखाणण्या जोगी नाही कां ? ह्यांच्या बाबतीत विशेष गोष्ट लिहावयाची म्हणजे ती ही की त्यांच्याच व्यवसायबंधू प्रमाणें त्या बिचाऱ्या स्वयंसेवकाची " क्रॉस एक्झॅमिनेशन " ( उलट तपासणी ) न घेतां किंवा सवालाची सरबत्ती सोडून स्वयंसेवकास घाबरावयास न लावतां अत्यंत नम्रतेने सर्व हकीगत विचारून अगदी आनंदाने शंभर रुपये दिले. श्री. दादासाहेब मावळंकरांचे अनुकरण दुसरी वकील मंडळी करतील काय ?

फंडा करितां येणारा स्वयंसेवक सार्वजनिक कार्याकरितां येतो, तेव्हां त्याच्याकडे प्रेमदृष्टीने पहावे अशी आमची सर्वांनाच विनंती आहे.

ईश्वर दादासाहेबांना त्यांचा कार्यांत बढती देवो ! !

जानेवारी १९२७.

# -स्फुट लेख-

विंचू मारून, सर्प ठेचून, अग्नि विझवून—तात्पुरते कां होईना घण—नष्ट करता येईल; परंतु प्रत्येक गोष्टीचे स्वत्व हरण करणाऱ्या पारतंत्र्यातील जनतेचा क्षोभाग्नि कोणत्याही सरकारास, कोणत्याही उपायाने नष्ट करतां येत नाही. नष्ट करण्याकरिता क्षोभाचेंच कारण दूर करावे लागते, म्हणजेच क्षोभी जनांना काकोरीच्या क्रांतिकारकासारखें स्वकीयांवरच दरोडे घालण्याची गुप्त मसलती करून क्रांतिची लाट देशभर पसरविण्याची किंवा क्षोभी जनांना बाँबला जन्म देण्याची कधिही पाळी येत नाही. परंतु विंचवात आणि पालीत, सर्पात आणि मुंगुसात, अग्नि आणि पाण्यात जेवढे सख्य असते तेवढे सख्य जीत आणि जेत्यांत असते. तेव्हां अर्थातच पालीच्या झडपेने विंचू संतापला, मुंगुसाच्या भितीनें सर्प क्षोभला किंवा पाण्याच्या अस्तित्वाने अग्नि निराशला तर जसे त्या पाण्याला, मुंगुसाला आणि पालीला काही होत नाही, तसे जीत क्षोभले तरी जेत्यांना काही होत नाही. परंतु मानवात आणि प्राण्यात जो फरक आहे तो येथेच. प्राणी आपल्या शत्रुला बघून घाबरतो, क्षोभतो व शेवटी फार तर त्याच्या तावडींतून निसटण्याचा प्रयत्न करतो पण मनुष्य आपल्या शत्रुला बघून, अन्यायाला बघून घाबरत तर नाहीच पण उलट संतापतो, व शत्रुला चिडविण्या

करिता अन्यायाला नष्ट करण्या करितां दृश्य अगर अदृश्य प्रयत्न करतो, व शेवटी विजयी बनतो. ही गोष्ट इटली, आयर्लंड अमेरिका वैगेरेच्या गत कथा वरुन स्पष्ट होते.

*  *  *  *

काकोरीचे क्रांतिकारक म्हणजे हे क्षोभीं जनांतील दुसऱ्या मार्गाचे म्हणजे अदृश्य मार्गाचे अवलंबन करणारे होत. ह्या महान क्षोभी देशभक्तांनी स्वातंत्र्यार्थ पैशा करिता माय भूमिच्या कंठावर नखदेत असलेल्या धनिकांना लुटले. अशी ही लुटफाट कित्येक दिवस चालली होती. शेवटी सरकारने कांही मंडळीना पकडले. गुप्त कारस्थान फुटले. देशार्थ तीळतीळ तुटणाऱ्या नवयुवकांचे अंतःकरण उघडले झाले. स्वातंत्र्यार्थ अदृश्य प्रयत्न केल्याच्या भयंकर आरोपावरून—क्रांतीच्या आरोपावरून त्यांच्यावर खटला करण्यात आला. न्यायमंदिरात ह्या देशभक्तांची येरझार सुरू झाली. जनता जागृत झाली, देशभक्तांच्या तेजस्वी चालण्याने हिंदभूमि हदरुन गेली ह्या क्रांतिकारकांच्या लुटालुटीत स्वार्थाचा लवलेशही नव्हता, असे न्यायाधिशाने स्वहस्ताने न्यायपत्रावर ( जजमेंट मध्ये ) स्पष्ट लिहिले आहे. अशा ह्या स्वातंत्रप्रिय निःस्वार्थ देशभक्तांपैकी दोघे जण हीन दीन हिंद भूमीची करुण कहाणी सविस्तर कळविण्या करिता फांशीच्या शिडीने स्वर्गी गेले.

ह्या पारतंत्र्याच्या लढ्यात आनंदाने फांशी स्विकारून विष्णुपदी रम माण झाले. " निःस्वार्थी देशभक्तांना सरकारने फांशी दिले, पण

-स्फुट लेख-

जनतेने रामप्रसादाच्या प्रेताची मिरवणूक काढून गौरविले. ह्या प्रेताच्या मिरवणुकीपासून खुद्द सरकारला आणि इतर जनतेला पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. ह्या बोधापासून सरकारने शहाणे व्हावे हे ठीक, आणि जनतेने सावध रहावे हे ठीक.

ह्या क्रांतिकारक युवकांपैकी एका युवकाचे वय १८ असून त्याला ७ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली. दुसऱ्याचे वय २४ आहे व त्याला १० वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली. व बाकीच्यांना जन्मठेप काळेपाणी मिळाले.

जानेवारी १९२८.



# —भारतासि नुरला त्राता—

( दे. दास यांचे मरणप्रसंगी. )

कवीः—यशोदातनय.

( चालः राजहंस माझा निजला )

( १ )

आकाश फाटुनी गेले । फाटलीच वाटे धरणी ।
की कुऱ्हाड आकाशींची । पडलीच काय हो वरुनी ।
ओतावे तप्तचि तैल । तेवीच झोंबली कर्णी ।
निधनाची ऐकुनि वार्ता
हंबरडे फोडी जनता
शोकाकुल तिजला बघता
मच्चित्ता गमले आता । भारतासि नुरला त्राता ॥१॥

( २ )

स्वर्गांत चित्तरंजन तो । प्रभु चित्त रंजना करिता ।
सोडुनी सकलही जाओ । एकाचि लक्षुनी पंथा ।
तो भारतभूचा दास । दुःखांत लोटुनी जगता ।

देशासी नुरले त्राण
वंगांचा केवळ प्राण
कालाने हरिता जाण
काहीच सुचेना चित्ता। भारतासि नुरला त्राता ॥२॥

(३)

राष्ट्राच्या दीपामधली । तेजोमय ज्योती विझली ।
भूमाता कंठामधली । ही मौक्तिकमाला तुटली ।
आर्यांच्या मुक्तीसाठीं । प्राणांची आहुति दिधली ।
स्वातंत्र्य रणांगणिं ज्याने
रणधुमाळि केली त्याने
झुंजला झुंज जोमाने
सेनानी युद्धीं पडता । भारतासि नुरला त्राता ॥३॥

(४)

शरीरांतील आत्मा जाता । शिथिल सर्व गात्रे होती ।
अश्रूंनी भरले नेत्र । काहीच दिसेना भवती ।
कुंठुनी मतीही जाते । काव्याला न चले स्फूर्ती ।
आवरा विवेकें शोका
राष्ट्राची झुकली नौका
देवाचीं करुणा भाका
कर्णधार डोहीं बुडता । भारतासि नुरला त्राता ॥४॥

(५)

परमेशा प्रार्थी तुजला । अितुकेचि देअि आम्हाला

परदास्यीं रुतली माय । त्यांतुनी उद्धरी तिजला ।
स्वातंत्र्य देउनी आम्हा । दे शांति तया आत्म्याला ।
दासांच्या देशी आजि
देशाची राखे बाजी
सद्‌बुद्धि देउनि काजी
योजावे सत्वरि आतां । भारतासि नुरला त्राता ॥५॥

## दैवास.

(कवयित्री—श्री. सरस्वती बाई.)

(वृत्तः–गज्जल.)

दैव म्हणुनि काय चीज, कवी कुणी चाखली ।
स्वप्नी की जागृतीत, रम्य मूर्ति देखिली ॥
हंसवि रडवी लीलेने, बाहुल्यापरी जना ।
अहंवृत्ति मनुजाची, तिळ न कमी होईना ॥१॥
म्हणुनि पाडि उच्चवृत्ति, पतन होय मानवा ।
क्रूर दैव हासते, उमजशील केधवा ?
बेत खूप मम मनिचे, डोलारे वाळवंटी ।
क्षण एकीं नाश करुनि, दैवा तव होय शांति ॥२॥

जानेवारी १९२८.



# गृहिणी.

(लेखिका:—एक गृहिणी.)

गृहिणी ह्या शब्दाचा अर्थ गृहाची स्वामिनी असा आहे. प्रत्येक स्त्री आपल्या घराची स्वामिनी आहे. गृहराज्यातील व्यवस्था पहाणे, आपल्या मनाप्रमाणे त्याच्यात सुधारणा करणे हे तिच्या हातात आहे. आपल्या कुटुंबातील गृहसौख्य मुख्यतः स्त्रीवरच अवलंबून आहे. इतकी गृहिणीपदाची थोरवी आहे. सारख्या विचाराच्या, व सारख्या स्वभावाच्या मनुष्यामध्यें सख्य वास करू शकेल, असा सर्व साधारण नियम आहे. मित्रांचे एकमत व ऐक्य विचार झाल्याशिवाय त्यांची मैत्री फार दिवस टिकू शकत नाही, तर ज्या दोन मित्रांच्या गाठी पडावयाच्या व ज्यामध्यें केवळ मृत्यूशिवाय ताटातूट व्हावयाची नाही, व ज्यांचे सर्व आयुष्य एके ठिकाणी जावयाचे अशा ह्या पतिपत्नीरूपी मित्रांचे परस्पर विचारांत किती साम्य असले पाहिजे बरें?

परंतु हली स्त्रियांची अशी स्थिती झाली आहे कीं, त्यांच्यात व त्यांच्या पतीत जमीनअस्मानाचा फरक असतो. कारण पती सुशिक्षित असतात तर स्त्रिया अशिक्षित असतात, पुरुषांची मने सुसंस्कृत झालेली असतात तर बायकांची त्याविरुद्ध असतात. व त्यामुळेंच पुरुषांना

आपल्या मित्रांमध्ये वेळ घालविणे आवडते, आणि ह्मणूनच ते घरांत फारच थोडा वेळ टिकतात. पुरुष जर बाहेरून दमून भागून आले तर त्यांच्या मनोरंजनार्थ वाचून दाखविण्याची सिद्धता देखील स्त्रियांची नसते; तर मग काही वाचून त्याबद्दल वाटाघाट करण्याचें सामर्थ्य अंगी कसे येणार? म्हणून प्रत्येक स्त्रीला थोडया बहुत शिक्षणाची आवश्यकता असते. कारण पुढे त्यांना त्या शिक्षणाच्या बाबतीत पुष्कळ उपयोग होतो.

गृहिणीचे मुख्य कर्तव्य मुलबाळांची उत्तम रीतीनें जोपासना करणे हे होय, व ते काम फार जोखमीचे असते. पण ते कार्य प्रत्येक स्त्रीनें उत्तम रीतीनें बजाविले पाहिजे. हे मुख्य कार्य स्त्रियांच्या हातून योग्य रीतीने पार पडत नाही म्हणून मुले अशक्त होतात. हा हलग-र्जीपणा न होऊन देण्याविषयी फार काळजी घेतली पाहिजे.

मुले मोठी झाल्यावर घरीच थोडे दिवस स्वतः मातेनेच त्यांना शिक्षण दिले पाहिजे, व तसे करण्यासाठी प्रत्येक स्त्री सु–शिक्षित असली पाहिजे.

गृहिणीच्या अंगी प्रेम वास करीत असले पाहिजे. संसारांत प्रेम हे सर्वस्वी आंहे. प्रेमाशिवाय संसार नीट चालणार नाही. प्रेमळ, साध्वी व सुशील स्त्रीपासून पतीला जितके सौख्य मिळेल तितके राजवाडयात व दासदासींकडूनही मिळणार नाही. गृहस्वामिनीचा घरातल्या माणसावर तावा चालविण्यास प्रेमरूपी कायदा असला पाहिजे.

घरच्या मंडळीवर व नोकरचाकरावर तिचे सारखे प्रेम असले पाहिजे. स्त्रीची प्रत्येक कृति व वागणूक प्रेमळ असली पाहिजे.

जी स्थिती देवाने दिली असेल तिच्यांतच काटकसरीने संसार करून सर्वांनां आनंद देण्यातच तिनं समाधान मानून घेतले पाहिजे. आपल्याला चांगली चांगली वस्त्रे नेसावयाला मिळत नाहीत म्हणून स्त्रीने औदासीन्यात दिवस घालविणे योग्य नाही. घरांतील स्त्री दुःखी असली म्हणजे त्याचा परिणाम घरांतल्या सर्व माणसांवर होतो.

सर्व गुणांनी युक्त अशी स्त्री ज्याला लाभेल तो सर्व जगांत धन्य होय! अशी ज्याला माता मिळेल तो पुत्र धन्य होय!! ज्या भूमींत अशी स्त्रीरत्ने निपजतात ती भूमीही धन्य होय!!!

जानेवारी १९२६.

# तलवार कीं लेखणी.

लेखकः—श्री भालचंद्र सदाशिव शेवडे

हल्लीच्या परिस्थितीत तरुणांचे कर्तव्य काय असावें या विषयावर ठिकठिकाणी भाषणद्वारा विचार प्रदर्शित केले जात आहेत व त्याच विषयावर एका महाराष्ट्रीय तरुणाचे विचार अनाठायी होणार नाहीत असे वाटते.

सध्यांची हिंदुस्थानदेशाची व विशेषतः हिंदुसमाजाची करुण अवस्था पाहिल्यास असे दिसून येईल की प्रत्यही तो समाज खाली जात आहे. शिक्षणाने तरुणांची डोकी फिरून गेली आहेत व त्यामुळें कोणतीही विरोधक चळवळ करण्यास हिंदु तरुण पुढे सरसावत नाही. जुलमाचा सशस्त्र प्रतिकार करण्याचे ऐवजी लगेच तो कायद्याचा व न्यायमंदिराचा अवलंब करितो व यांतच त्याचें दौर्बल्य दिसून येते. हे सर्व वेड (Mania) शिक्षणाचे फळ आहे. शिक्षण घेण्यात सर्व सत्व खर्च झाल्यामुळे शरीरात जोम व त्राण उरत नाही व मुलगा 'बी. ए.' झाला की तो जिवंत हाडाचा सांपळा तयार होतो हे दृश्य नेहमी पहात असतांही समजते पण उमजत नाही या न्यायाने तो तरुण त्याकडे दुर्लक्ष करितो. ज्याप्रमाणे एखादा किडा दिव्यावर जातो व

तथें त्यांचे मरण आहे हे माहीत असताही दिव्यावर जाऊनच स्वतःचा नाश करून घेतो, तद्वत् या हिंदु तरुणांची स्थिती झाली आहे. तीच अशिक्षित मुसलमानांची गोष्ट पहा. ह्यांचा समाज लहान आहे तरी-सुद्धां ते पूर्वीपासून आजतागायत हिंदूवर अेकपरीने अधिकार चालवीत आहेत. यांत त्यांचे नुकसान आहे हे ह्यांचे लक्षांत येत नाही ते निराळे. हिंदूशी त्यांची वागणूक धर्मराजाच्या उक्तीप्रमाणे म्हणजे

परस्परापराधेषु वयं पञ्च शतं च ते ।
अपरैः परिभूतास्तु वयं पञ्चोत्तरं शतम् ।।

अशी असेल तर ती केव्हांही दोषार्ह, नाही, परंतु " अपरैः ( आंग्लैः ) परिभूतास्तु वयं पञ्च शतं च ते " हाच विचारसरणी त्यांनी कायम ठेविल्यामुळे राज्य करण्यास फार सुलभ झाले आहे. " फोडा व झोडा " या पद्धतीने राज्य चालले आहे हे सर्वमान्य आहे. नाहीतर राज्यकर्त्यास पळता भुअी थोडी झाल्याशिवाय रहाणार नाही तेच सुशिक्षित मुसलमानांत पाहिले तर असे आढळून येअील की शिक्षणाचा त्यांच्यावर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही, व म्हणून ते सहसा त्यांचे अितर बंधूप्रमाणे अेकदम हात अुचलण्यास सिद्ध होत नाहीत.

गतकालच्या अितिहासाकडे विहंगमदृष्टया अवलोकन केल्यास असे आढळते कीं आजपासून तीनशें वर्षांपूर्वी " महाराष्ट्रभूमि ही वीरांची खाण आहे " असा महाराष्ट्राचा नांवलौकिक होता. त्यावेळी नायकांची निशाणी बांगडी, मराठी वीरांची निशाणी कट्यार

आणि शेतकऱ्याची निशाणी नांगर होती. अलीकडे महाराष्ट्र हा शिक्षणाचे आगर झाला असून महाराष्ट्रभूमि ही लेखकांची व वक्त्यांची खाण बनली आहे. परंतु पारतंत्र्याच्या शृंखला तोडण्याचे सामर्थ्य जे शिवबाचे तरवारीत होते ते या लेखणीत नाही. शिवाजीने अवरंगजेबाला तरवारीचे धारेवर नाचविले. अफझुलखानाचा वध त्याने शस्त्राने केला. शिवरायाने महाराष्ट्रांत स्वराज्याचा भगवा झेंडा उभारला तो स्वपराक्रमाच्या व तरवारीच्या जोरावर व म्हणूनच त्या लहान राष्ट्राचे, पुढे महाराष्ट्र बनले. शिवराय सांगतात की स्वराज्य ही भिक्षेची वस्तु नाही. ते मागितल्याने मिळत नसते ते मिळविण्यासाठी स्वतःला पात्र करावे लागते. " Deserve and then desire " व एकदां आपण पात्र आहोत अशी खात्री झाली म्हणजे मग अिच्छित वस्तु घरीच चालून येअील. पण पात्र होण्यास काय केले पाहिजे असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. याचे उत्तरही प्रत्येकाला माहीत आहे तरी-पण शिवरायांचे अधिकारी वाणीतून ते ऐकण्यात विशेष मौज आहे. अेकदा मावळ्यांनी त्यांना प्रश्न केला.

मावळे—श्रीमत्स्वातंत्र्याचा ठेवा कैसा मिळवावा ।
अम्हां नसे रे ठावा शिवबा कवण देव ध्यावा ॥
शिवाजी—करीं ती धरा भक्त शंकरा भवानि तलवार ।
अविंध सारा चिरा चरचरा व्हाल दास्यपार ॥

हे परराज्याचे जूं मानेवरून भिरकावून देण्यास शिंगाचा तरवारीच किंवा कोणत्याही शस्त्राचा उपयोग केला पाहिजे.

लो० टिळकांना हे म्हणणे पूर्णपणे पटले होते, व म्हणूनच त्यांनी प्रतियोगी–सहकारितेचे तत्त्व अमलांत आणण्याची पराकाष्ठा केली. " ये यथा मां प्रपद्यन्ते " ही त्यांची राजकारणातील गुरुकिल्ली होती. ते ज्यावेळी विलायतेस गेले त्यावेळी कै० गडकऱ्यांनी त्यांना सूत्रबद्ध विनंति केली ती सर्वविश्रुतच आहे. ते म्हणतात–

न लगे दौलत, न लगे बरकत, नको कोहिनूर ।
स्वदेश न लगे, स्वराज्य न लगे, हो सर्वहि चूर ॥
अेक सांगणे अेक मागणे तेच लाखवार ।
**मागुनि ाावी श्रीशिवबांची भवानि तलवार ॥**

कोहिनूर नको, स्वदेश नको, इतकेंच काय पण ज्यासाठी इतकी धडपड चालली आहे ते स्वराज्य देखील नको. फक्त श्रीशिवबांची तरवार ( जी त्यावेळी ब्रिटिशसरकारच्या अजबखान्यांत आहे अशी समजूत होती पण हल्ली ती हिंदुस्तानातच किंबहुना महाराष्ट्रांतच कुठेतरी आहे अशी माहिती वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत आहे ) मागून आणावी. याचा अर्थ अितकाच की तलवारीशिवाय-शस्त्राशिवाय–स्वराज्याच्या सर्व आशा फोल आहेत. या अुपदेशाची सत्यता जनतेस हळुहळु पटत आहे व विश्वविद्यालयातून सध्या लष्करीशिक्षण देण्यात येत आहे. जिकडे तिकडे आखाडे, व्यायाममंदिर प्रस्थापित होअून कुस्ती, लाठी वगैरेंना प्राधान्य देण्यात येत आहे. शारीरिक शिक्षणाला अुत्तेजन मिळत आहे इतकेच नव्हे तर काही दिवसांनी त सक्तीचे होईल अशी बळकट आशा आहे. आधुनिक काळातील हिंदु तरुण

स्वसंरक्षण करण्यासदेखील असमर्थ आहे, मग तो त्याच्या मातोश्रींची व भगिनींची अब्रू कशी संभाळणार ? हें ओळखूनच कीं काय वे. रा- दिवेकरशास्त्री यांनीं " हिंदु समाज समर्थ कसा होईल " या पुस्तकांत स्त्रियांना आत्मसंरक्षणासाठीं लाठी शिकण्याचा अुपदेश केला आहे व काहीं ठिकाणीं स्त्रिया लाठीबाज तयारही होत आहेत.

पाश्चात्य देशाकडे पाहिल्यास हीच गोष्ट प्रामुख्याने दृष्टोत्पत्तीस येते की प्रत्येक राष्ट्राला स्वतंत्र होण्यास प्रतिपक्षाशी झुंज खेळावी लागली आहे शत्रूंशी रणांगणांत सामना द्यावा लागला आहे. प्रतिनिधि मंडळाचा ( Deputation ) अर्जांचा किंवा चर्चेचा काहीएक उपयोग झाला नाही. अमेरिकेला इंग्लंडपासून स्वतंत्र होण्यास प्राणाहुति द्याव्या लागल्या आहेत. अमेरिकेने स्वराज्य मागून मिळविले नसून स्वतःच्या मनगटाच्या जोरावर मिळविले आहे, व म्हणूनच आज तो देश सर्वांच्या अग्रभागी असून स्वातंत्र्याचे अुच्च शिखरावर स्वर्गीचा आनंद अुपभोगीत आहे. आपण पहाता पहाता आयर्लंड देश स्वतंत्र झाला, इटाली देश देखील स्वतंत्र झाला आहे. परंतु गरीब हिंदुस्थान अद्याप पारतंत्र्याचा बेड्यांनी जखडलेलाच आहे ! फार लांब कशाला ? प्रस्तुत राज्यकर्ते इंग्रजसरकार यांचा तरी शिरकाव या सुवर्णभूमीत कसा झाला या त्यांच्या इतिहासाकडे पाहिले म्हणजे मनुष्य अगदी मतिमूढ होऊन जातो. ज्याप्रमाणे दिवस कुठे संपतो व रात्र कुठे सुरू होते हे ओळखणे कठीण असते त्याचप्रमाणे सत्ता एका हाता- तून दुसऱ्या हातात कशी गेली हे समजणे कठीण झाले आहे. तराजू

तलवार आणि तख्त या पायऱ्यांनीच त्यांनी आज राज्याचे शिखर गाठले आहे. प्रथम इ. स. १६०० मध्यें इंग्रज व्यापारी या नात्याने हिंदुस्थानात आले, पण नुसताच व्यापार करण्यासाठी ते आले नव्हते. त्यांची महत्त्वाकांक्षा फार जबर होती. जमल्यास आणखीहि काही गोष्टी करण्याचे त्यांनी योजिले होते. येथे येऊन हिंदु राजांचा बेफिकीरपणा, ऐषआराम, त्यांची राज्य करण्याची पद्धति वगैरे सर्व गोष्टींची काकदृष्टीने टेहेळणी करून "भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी" या न्यायानुसार हा कमरेवर जानवे ठेवणारा इंग्रज भट तरवारीच्या बळावर ओसरीवरच हातपाय पसरायचा थांबला नसून थेट घरांत जाऊन मालकालाच त्याचे गादीवरून गचांडी देऊन स्वतः राज्य बळकावून बसला आहे; व स्वतःच्या मालकीची वस्तु परत घेण्यास कोणतीहि आडकाठी असण्याचे कारण नाही. पण ती परत मिळविण्याचे सामर्थ्य मात्र पाहिजे. एके काळी ज्याने सर्व यूरोपखंड थरारून सोडला होता तो नेपोलियन बोनापार्ट हेच म्हणतो की, "With sword in my hand and Bible in my pocket I shall carve my way through the world."

रामायणमहाभारतकालीन युद्धाचीसुद्धां हीच शिकवण दिसते आहे. श्रीरामचंद्राने अंगदाला शिष्टाईवर पाठविले व सामोपचाराने सीतामाईची मुक्तता करण्यास दशमुखी रावणास विनंति केली. पण त्याचा काहीएक उपयोग झाला नाही. शेवटी श्रीरामाला हातात धनुष्य-बाण घ्यावे लागले तेव्हां सीतादेवीची अशोकवनिकेतून सुटका झाली. पाण्डवांनी आपले राज्य परत मिळावे म्हणून श्रीकृष्णाच्या नेतृत्वाखाली

अेक प्रतिनिधिमंडळ कौरवाधिपति दुर्योधनाकडे पाठविले होते, परंतु ते जसे गेले होते तसेच परत आले. पाण्डवांनी ज्यावेळी कौरवांशी युद्ध केले तेव्हांच कौरवांचा नाश होअून पाण्डव स्वराज्य मिळवूं शकले. उलटपक्षी म्हणजे द्रोणाचार्य अश्वत्थामा वगैरे योद्धयांनी खड्ग-न्यास केला तेव्हांच कौरवांचा पराजय झाला. प्रत्यक्ष श्रीकृष्णांनी गीतेत अर्जुनास हाच उपदेश केला आहे की. "बाबारे, तुला तुझा धर्म राखायचा असेल, आणि गेलेले राज्यवैभव परत मिळवायचे असेल तर तुला लढाअी ही केलीच पाहिजे.

अेकंदरीत वरील विवेचनावरून असे अनुमान काढता येअील की तलवारीशिवाय कोणतेही राष्ट्र स्वतंत्र होणे अशक्य आहे. सध्याचे तरुण युवक हे भावी स्वराज्याचे आधारस्तंभ आहेत व स्वातंत्र्याची भव्य अिमारत या तरुण-पिढीच्या मजबूत पायावरच अुभारली जाणार आहे. पण ही जबाबदारी तरुण ओळखून आहेत असे दिसत नाही. राष्ट्राचे जीवनातील तरुण मंडळी ही गत्यात्मक शक्ति (Dynamic Force) असून वृद्ध लोक ही स्थित्यात्मक शक्ति (Static Force) होय. म्हाताऱ्या मंडळींच्या अनुभवाची ढाल करून तरुणांनी आपली तल-वार चालविली पाहिजे. पुढारी जरी रात्रंदिवस देश स्वतंत्र करण्यासाठी झटत आहेत तरी त्यांना सक्रिय सहानुभूति दाखविणे हे तरुणांचे कर्तव्य आहे. लो. टिळक आपल्या एका सूक्तांत म्हणतात की श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत नुसत्या करांगुलीवर धरला परंतु त्याला गव-ळ्यांनी काठ्या लावल्याच होत्या. तात्पर्य की प्रत्येक हिंदु तरुणाने कसल्याही विकट परिस्थितीस तोंड देण्यास सदैव तत्पर असले पाहिजे.

## तलवार कीं लेखणी.

या सर्व प्रतिपादनाचा कोणी असा अर्थ करू नये की लेखाचा कल शिक्षणाला अजिबात फाटा देण्याकडे आहे. लेखणीविषयी अनुकूल असे कांहीच लिहिले नसल्याने मी सर्वस्वी त्याविरुद्ध आहे असा कयास बांधणे चुकीचे होईल. माझा हेतु तरवारीवरच विशेष जोर देण्याचा आहे, व मी स्वतः लेखणीपेक्षां तरवारीवरच ज्यास्त श्रद्धा ठेवतो. परंतु दोहोंचा समागम झाल्यास कोणतेही कार्य सुकरतर होईल यात शंका नाही. श्रीसमर्थांनी आपल्या उपदेशामृताचे घोट पाजून शिवबाला स्वराज्य मिळविण्यास प्रोत्साहन दिले हे विसरता कामा नये. फ्रान्समध्यें राज्यक्रांति घडवून आणण्याचे श्रेय व्हॉल्टेअर व रूसो यांचे द्विजिव्हा लेखणीलाच दिले पाहिजे. इटली देश स्वतंत्र होण्यास जोसेफ मॉझिनीहि कारणीभूत होताच. अत्यर्थ इतकाच की तलवार व लेखणी या दोहोंची जोडगोळी असल्यावर शत्रूचा टिकाव लागणे फार कठीण असते. परंतु त्यातदेखील डावेउजवे इतका फरक आहे व हा काही ल्हानसान फरक नाही. लेखणी ही संरक्षक ( Defensive ) स्वरूपाची द्योतक आहे तर तलवार ही आघातक (Offensive) स्वरूपाची निदर्शक आहे. लढाईमध्यें उजव्या हातात तलवार असते व डाव्या हातात ढाल असते एकवेळ ढाल नसल्यास शत्रूला बेजार करता येईल परंतु तरवारीच्या अभावी प्रतिपक्षास शरण जाणे भाग पडेल. अतएव मी तलवारीवर—अर्थात् सशस्त्र चळवळीवर—भार दिला आहे आज हिंदुस्थानला उत्तम किंवां नामांकित वक्ते नकोत आहेत. शूर योद्धे व लढवय्ये हवे आहेत.

---

# गामा आणि झिब्स्को—

लेः—श्री. व. ह. हेगिस्टे.

पतियाळात झालेली सर्वश्रेष्ठ मल्ल गामा आणि झिब्स्को यांची कुस्ती बहुतेक सर्व व्यायामभक्तांच्या परिचयाची आहे. दोघाही मल्लांपासून आपणास बोध घेण्यासारखे पुष्कळ असल्याकारणाने पतियाळात झालेल्या कुस्तीचेच वर्णन न लिहिता त्यांच्या चारित्र्याशी अल्पसा परिचय करून देण्याचा मानस आहे.

गामा हा हिंदुस्थानातील सर्वोत्कृष्ट कुस्तीबाज आहे, तर झिब्स्को हा युरोप अमेरिका अित्यादि ठिकाणचा अजिंक्य मल्ल आहे. त्या दोघा नृसिंहांची कुस्ती म्हणजे त्या दोघांतील कुस्तीचा लढा नसून, पाश्चात्य कुस्तीची पद्धती श्रेष्ठ, किंवा पौर्वात्य कुस्तीची पद्धति श्रेष्ठ, हा लढा होता. गामाने झिब्स्कोस ३० सेकन्दांत चारीमुंडे चीत करून जगाच्या निदर्शनास आणले की हिंदी कुस्ती—पद्धतच सर्व जगात श्रेष्ठ आहे.

हिंदुस्थानात कुस्तीची कला फार प्राचीन कालापासून चालत अलेली आहे. पूर्वी अेका काळी या कलेचा पूर्ण विकास झाला होता; पण सध्या ह्या कलेकडे लोकांचे दुर्लक्ष होत चालले, श्रीमंतांकडून

या कलेस उत्तेजन मिळेनासे झाले, आणि ज्यांच्याजवळ ही कला होती ते चोरून ठेवू लागले, ह्यामुळे मध्यंतरी ही कला अगदी नष्टप्राय झाली होती; पण आता पुन्हा ह्या कलेकडे लोकांचे लक्ष वेधूं लागले आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे, व त्याचेच द्योतक म्हणजे जगश्रेष्ठ मल्ल गामा याचा विजय होय. असो. हिंदुस्थानात ह्या कलेचे पुनरुज्जीवन होवो हीच श्रीबजरंगाजवळ प्रार्थना आहे.

झिब्स्को म्हणजे पाश्चात्यांचे केवढे मोठे धेंड आहे हे त्याच्या चारित्रावरून कळून येईल. झिब्स्कोचा जन्म पोलंड देशांत झाला. त्याचे खरे नांव स्टेनिस्लो शिवोनियेविन्स आहे परंतु त्याच्या अचाट शक्तीमुळें व प्रचंड शरीरामुळे त्याला झिब्स्को म्हणजे 'अस्वल' असे म्हणत; व पुढे हेच नांव प्रचलित झाले. शारिरींक शक्तीबरोबर त्याची बुद्धिमत्ताही फार चांगली होती. तो व्हियेनामध्ये पहिल्या श्रेणीत (फर्स्ट क्लास) वाङ्मयविशारद ( ग्रॅज्युएट ) झाला, व २३ व्या वर्षी कायदेपंडित ( बॅरिस्टर ) झाला. याने आपल्या २७ साव्या वर्षांच मोठमोठया पहिलवानांना हात दाखविला होता; त्यासमयींच तो जवळजवळ सबंध युरोपमध्ये अजिंक्य झाला. त्याला जसजशी विजयश्री वरत गेली तसतशी त्याची महत्वाकांक्षा वाढत गेली; व स्वतःस त्याच व्यवसायात वाहून घेतले. २३ व्या वर्षी बॅरिस्टर झाल्यावर बॅरिस्टरी करावी, किंवा दुसरे काही करावे ह्यासंबंधी त्याच्या मनांत प्रश्न पडला. अंगात पूर्ण जोम असतां व मनगटात संपूर्ण शक्ति असतां मऊ मऊ खुर्च्यांवर बसून बॅरिस्टरी करणे त्याला कसे आवडावे?

त्याने बरिस्टरीला अजिबात फाटा दिला व आपली सर्व शक्ति ह्या बाजूलाच एकाग्र केली.

विसाव्या वर्षीच 'विन्डीबो वेटलिफ्टिंग क्लब'चा तो सभासद झाला. येथे त्याने जारीने वेटलिफ्टिंग करून शरीर आटीव व चिवट बनविले व तदनंतर कुस्तीत प्रावीण्य मिळविण्याच्या मार्गाला लागला.

युरोप व अमेरिकेतील सर्व मल्ल कुस्तीच्या एखादेदुसऱ्या डावांत संपूर्ण प्रावीण्य मिळवून स्वतःच्या जयाची भिस्त त्यावरच ठेवीत. झिब्स्कोचे तसे नाही. त्याने अत्यंत परिश्रमाने व चिकाटीने बऱ्याच डावांत प्रावीण्य मिळविले आहे. तो मनाचा उदार असल्यामुळे ज्याची कुस्तीची पद्धति श्रेष्ठ त्याचे श्रेष्ठत्व मान्य करून त्याचे अवलंबन करावयासही चुकत नसे. युरोप व अमेरिकेमध्ये गुडघ्यापर्यंत चड्डी घालून पायांत बूट व गुढघ्यावर संरक्षक चढवून कुस्ती करतात. झिब्स्कोस ही पद्धत पसंत नाही. तो हिंदुस्थान पद्धतीची चड्डी घालतो, पाश्चात्य मल्लाप्रमाणे पायांत बूट अित्यादि काही घालीत नाही व त्याचप्रमाणे तो डोक्यावर केंसही ठेवीत नाहीं.

झिब्स्को रोज नेमाने १॥ पासून २ तास व्यायाम घेतो. तो मांसमद्यादि कधीही सेवन करीत नाही. सात्विक व अल्पाहारावरच त्याच्या शक्तीची अिमारत अुभी राहिली आहे. सर्व युरोपिअन मल्ल ३०-३५ वर्षानंतर शक्तीने क्षीण व्हावयास लागतात व कुस्तीस अयोग्य

होतात. झिब्स्को हा ह्यांस अपवाद आहे. त्याने पन्नाशीनंतरही अनेक तरुण शक्तिवान मल्लांना पराजित केले आहे. गामाच्या जोडीचा ऐन-पंचविशीतील तरुण हिंदु पहिलवान कल्लुगामा ह्याचा त्याने वयाच्या ५५ व्या वर्षी पराभव केला, व ५६ व्या वर्षी गामासारख्या शक्ति-शाली नरशार्दूलाशी मल्लयुद्ध करून त्यावर विजय मिळविण्याची आशा बाळगली. अभिमानाने तो असे म्हणतो कीं, ६० वर्षांपावेतो याच धमकीने मी कुस्ती खेळेन. ५६ व्या वर्षीही तो शरीराने किती प्रचंड आहे हे खाली दिलेल्या त्याच्या शारिरीक मापावरून लक्षांत येईल.

वय ५६

| | | | |
|---|---|---|---|
| उंची | ५ फूट ८ अिंच. | पोठरी | १८॥ अिंच. |
| वजन | २५२ रतल ( ६ मण १२ शेर) | छाती | ५८ अिंच. |
| प्रकोष्ट (कांबीट. Forearm) | १८। अिंच. | मान [Neck) | २२। अिंच. |
| दंड ( फुलवून ) | २२ अिंच. | मनगट | १२॥ अिंच. |
| | | जांध (Thigh) | ३२ अिंच. |

येवढ्या शरीराचे कुस्तीबाज जगामध्ये फारच थोडे म्हणजे बोटावर मोजण्यासारखे आहेत. युरोपमध्ये हेकन्ट स्मिथ व अमेरिकेत फ्रँक गॉश हे ह्याच्यापेक्षां शरीराने प्रचंड होते. हिंदुस्थानात असे ५—६ पहिलवान होते. पहिलवान गामा ह्याचे झिब्स्कोपुढे फारच किरकोळ शरीरमाप आहे, ते येणेप्रमाणेः—

वय ४४

अुंची ५ फूट ७ अिंच छाती ४८ अिंच.

वजन २०५ रतल (५ मण ५ शेर) मनगट ७ अिंच.

प्रकोष्ट ( Forearm ) १४ अिंच. जांघ ( Thigh ) २७ अिंच.

दंड १७॥ अिंच.

झिब्स्कोपुढे गामाचे शरीर जरी किरकोळ असले तरी त्याच्या अतुल्य चपळतेमुळे व कुस्तीतील डावपेचातील प्रावीण्यामुळे तो झिब्स्कोपेक्षा सरस ठरला.

लंडनमध्ये १९१० साली शनिवार ता. १० सप्टेंबर रोजी गामा आणि झिब्स्को यांची युरोपियन पद्धतीप्रमाणे कुस्ती झाली होती. गामाने सलामी घेताच झिब्स्कोस खाली आणिले. पण या कुस्तीच्या पद्धतीत तो अनभिज्ञ असल्याकारणाने तो बेताबेतानेच खेळत होता. त्याने जरी सतत तीन तास झिब्स्कोस खाली दाबून ठेविले, तरी त्यास चीत करूं शकला नाही, तीन तासपर्यंत काहीच निकाल न लागल्याने कुस्ती बंद ठेवण्यात आली, व पुढच्या शनिवारी पुन्हा सामना करण्याचे ठरले. ठरल्याप्रमाणे गामा नाटकगृहांत (थिएटरांत) अुपस्थित होता पण झिब्स्को मात्र आला नाही. तेव्हां गामा यांस 'वर्ल्ड चॅम्पियन बेल्ट' बक्षीस देण्यात आला. ती अपूर्ण राहिलेली कुस्ती ता. २९ जानेवारी १९२८ रोजी म्हणजे १७ वर्षांनी पूर्ण होअून तिचा निकाल संपूर्णपणे गामाच्याच बाजूचा लागला.

## गामा आणि झिब्स्को.

युरोपपेक्षा अमेरिकेने कुस्तीच्या कलेत फार प्रगति केली आहे. तेथील अत्यंत चपळ व अत्युत्तम खेळाडू फार्मर बर्न्स ह्याने अत्यंत परिश्रम करून व स्वतः ह्याच कुस्तीच्या व्यवसायास वाहून घेऊन, कुस्तीचे नवीन नवीन डाव शोधून डावाचे बरेच भांडवल संपादिले होते. त्याच्या कुस्तीतील अतुल्य चापल्यामुळे व प्रावीण्यामुळे आणि तेथें तो प्रथमच चांगला कुस्तीबाज असल्यामुळे त्यास फादर ऑफ रेस्लिंग म्हणत. त्याने तेथे कुस्तीची आवड वाढवून सर्व अमेरिकेत तिचा प्रसार केला आहे. त्याच्या परिश्रमाचे उत्कृष्ट फल म्हणजे फ्रेन्क् गॉश् होय. गॉशने १९१७-१९१८ च्या सुमारास अमेरिकेतील सर्व पहिलवानांना पराजित करून चॅम्पिअनशिपचा बेल्ट मिळविला. युरोपचा जुना चॅम्पियन हेकन्ट स्मिथ यास त्याने दोन वेळा कुस्तीत पराजित केले होते; तो अभिमानाने म्हणत असे की "मी झिब्स्कोस अेक तासांत दोन वेळां हरवूं शकेन व तसें न केल्यास हार खाल्ली असे मान्य करीन. झिब्स्को तेथे गेल्यावर दोघांचा सामना झाला. गॉश हा झिब्स्कोला अेकदाही चीत करू शकला नाही. ह्या विजयाने झिब्स्को युरोप व अमेरिकेचा चॅम्पिअन झाला. गॉश म्हणत असे की, 'मी झिब्स्कोसारखे दोनच पहिलवान पाहिले. (१) युसफ (टर्की अरबस्तानचा) आणि (२) हेकंट स्मिथ (गामाविषयी त्याला काहीच माहिती नव्हती) गॉशने हेकंट स्मिथचा दोनदा पराजय केला होता. अमेरिकेतील (Retired) वानप्रस्थी चॅम्पिअन डॉ. रोलर (ह्याने डॉक्टरीच्या बऱ्याच पदव्या मिळविल्या असून नामांकित

डॉक्टरही होता. ) याच्याशी झिब्स्कोची कुस्ती झाली, त्यांत काहींच निकाल लागला नाही; पण रोलर यांस गामाने इंग्लंडमध्ये संपूर्ण पराजित केले होते. तेव्हां गामा झिब्स्कोपेक्षाही सरस ठरला होता; पण प्रत्यक्ष असा निकाल अद्याप लागावयाचा होता.

सन १९१४ मध्ये युरोपमध्ये जेव्हां महायुद्ध सुरू झाले तेव्हां झिब्स्को रशियात होता. तेथे त्याला रशियन सरकारने हेराच्या संशयावरून पकडले होते. तुरुंगातील यमयातनेमुळे झिब्स्को बराच क्षीण झाला. काही दिवसांनी झिब्स्को हा उत्तम कुस्तीबाज आहे अशी बातमी रशियन अधिकाऱ्यांना कळली. तेव्हां त्या अधिकाऱ्यांनी त्याच्या सुटकेकरिता अशी अट घातली की, त्याने रशियातील त्या-वेळचा सर्वश्रेष्ठ मल्ल आवर्ग याचा कुस्तीत पराजय करून स्वतःची सुटका करून घ्यावी, व तसे न झाल्यास—म्हणजे झिब्स्को हरला तर-त्यास देहान्त शिक्षा होईल. झिब्स्कोने ही भयंकर अट मान्य केली. बंदिखान्यातील यातनांनी जरी तो अशक्त झाला होता तरी त्याने मस्त आवर्गास संपूर्ण पराजित करून स्वतःची सुटका करून घेतली.

यानंतर झिब्स्को १९२७ मध्ये अमेरिकेस गेला. तेथील त्यावेळचा चॅम्पिअन लुअी याचा पराभव करून अमेरिकेची चॅम्पिअनशिप मिळविली. परंतु ही चॅम्पिअनशिप झिब्स्कोजवळ फार दिवस राहिली नाही, कारण लुअीने पुनः त्याच वर्षी झिब्स्कोचा पराभव करून

चॅम्पिअनशिप हस्तगत केली. पण ही चॅम्पिअनशिप लुईजवळ-सुद्धा फार वर्षे टिकली नाही; कारण १९२४ मध्ये मून नांवाच्या मल्लाने लुईजवळून घेतली. परंतु त्यालासुद्धा ती फार दिवस लाभली नाही. झिब्स्कोचा आणि मूनचा जंगी सामना त्याच वर्षी होऊन त्यात मून पराजित झाला. अशा रीतीने झिब्स्को हा अमेरिकेचा दुसऱ्यांदा चॅम्पिअन झाला.

१९२४ मध्ये अमेरिकेत झिब्स्कोची व हिंदुस्थानचा गोबर यांची कुस्ती झाली. गोबर (वय २८) हा कलकत्ता व केम्ब्रिज विद्यालयाचा बी. ए. आहे. हा हिंदुस्थानांत मल्ल गामागुलामजवळ कुस्ती शिकला. तो ७॥ मणाची जोडी फिरवितो. सबंध जगात त्याची जोडी फिरविणारा अद्याप कोणी त्याला भेटला नाही. तो तेथे १५०–२०० कुस्त्या खेळला. त्यापैकी तो १–२ कुस्त्याच हरला. झिब्स्कोची व त्याची कुस्ती झाली, त्यात झिब्स्कोने त्याला १७ मिनिटात चीत केले. दुसऱ्या खेपेस गोबरने झिब्स्कोस ३ मिनिटात चीत केले. पण तिसऱ्या खेपेस झिब्स्कोने गोबरला ७ मिनिटात चीत केले. ह्या तीन वेळच्या कुस्तीत झिब्स्को गोबरपेक्षां सरस ठरला. अचाट शक्ति असून अचाट बुद्धीही असूं शकते याची झिब्स्को, गोबर आणि डॉ. रोलर ही जिवंत उदाहरणे होत.

झिब्स्को ह्याप्रमाणे युरोप व अमेरिकेमध्ये विजयी झाला. इ. स. १९२५ मध्ये फ्रँक्गॉश जेव्हां वारला तेव्हा झिब्स्कोस अजिंक्य असा

अेकच हिंदुस्थानचा गामा राहिला. १९२७ मध्ये गामाशी कुस्ती खेळण्याकरिता तो हिंदुस्थानात आला, पण काही कारणामुळे कुस्ती झाली नाही तेव्हां झिब्स्कोची कुस्ती कडु गामाशी झाली. त्यांत झिब्स्को विजयी झाला. विजयी झाल्यानंतर झिब्स्को युरोपात परत गेला व १९२८ मध्ये मोठ्या गामाशी कुस्ती करण्याकरिता आला. शनिवार ता. २९ जानेवारी त्यांची कुस्ती ठरविण्यात आली. सारे जग विशेषतः अमेरिका व हिंदुस्थान ह्या कुस्तीच्या निकालाकडे आतुरतेने पहात होते.

प्रथम गामा हौद्यात दंड ठोकून अुभा राहिला नंतर झिब्स्को हौद्यात आला. गामाने सलामी घेताक्षणीच झिब्स्कोच्या पटात घुसून उजव्या हाताने त्याचा डावा पाय उचलून डाव्या हाताने झिब्स्कोच्या छातीत रेटा देअून त्यास खाली आणले व तसेच त्याला पालटून त्याचे अुरावर बसला. सलामीनंतर फक्त ३० सेकंदातच गामा झिब्स्कोच्या छातीवर बसलेला पाहून सर्व प्रेक्षकवर्ग आश्चर्यचकित झाला. झिब्स्को ह्या अपजयामुळे इतका हताश झाला कीं त्याला प्रेक्षकवर्गापैकी काहीं बडे बडे अिंग्रज अधिकारी व हिंदु राजे आश्वासन देण्याकरिता जेव्हां त्याचेकडे गेले तेव्हा त्यांचे आश्वासन स्वीकारण्याचे व आभार मानण्याचेही त्यास भान राहिले नाही. ह्यानंतर झिब्स्को नळावर अंघोळ करण्याकरिता गेला व अंघोळ करतां करतां म्हणाला कीं " Gama is a tiger of Punjab and a real sportsman, I accept his Superiority." ह्या विजयामुळे गामास तारेने अितकी अभि-

नंदने गेली कीं त्यांना सर्वांना जबाब देण्यासाठी म्हणून त्यास टाइम्समध्ये छापावे लागले कीं "मला पुष्कळ ठिकाणाहून अभिनंदनाच्या पुष्कळ तारा येत आहेत पण मी सर्वांना उत्तरे देऊं शकत नाही याबद्दल मी दिलगिर आहे. माझ्याबद्दल सहानुभूति दाखविल्याबद्दल मी सर्वांचा आभारी आहे."

ह्या विजयामुळे गामास जगश्रेष्ट मल्ल ( रुस्तमे झमान ) चीं पदवी देण्यात आली व त्याचे द्योतक म्हणून नक्षीदार चांदीची गदा भापाळच्या महाराजांच्या हस्ते देण्यात आली. गामाने कुस्तीत हिंदुस्थानचे नाव राखिले म्हणून प्रत्येक हिंदवासीयास त्याबद्दल कौतुक व अभिमान वाटेल. अशा या गौरवशाली हिंदी मल्लाच्या चरित्राचा अल्पसा परिचय करून देतो.

गामा हा पिढीजात मल्ल आहे. त्याचे आजेपणजे कुस्तीत नावाजलेले होते. त्याच्या दुर्दैवाने त्याचे वडील तो १०-१२ वर्षाचा असतानाच निवर्तले व एवढ्या लहान वयातच त्याच्यावर संसारबोजा येऊन पडला. १९१० पर्यंत त्याला कोणाचाच आश्रय नव्हता. थिएटरमध्ये जोड बांधावी त्यांत विजयी व्हावे व जे पैसे मिळतील त्यावर आपला कसाबसा निर्वाह चालवावा असा त्याचा क्रम असे. १९१० मध्ये गामा स्वतःचे नशीब अजमवण्यासाठी प्रो. राममूर्तीबरोबर युरोपमध्ये गेला. तेथे पहिल्यानें त्याला कोणीच विचारीना. परंतु त्याने अेकामागून अेक असे पुष्कळ मोठमोठयांना पराजित

केल्यावर तेथील लोकांना त्याच्याविषयी महत्व वाटू लागले. त्यावेळी युरोपमध्ये जपानी लोक कुस्तीच्या बाबतीत पुढे सरसावत होते पण गामाची कुस्ती पाहून ते पण चपापून गेले. हळुहळू गामाने मोठमोठ्या मल्लांना पराजित केले, शेवटी तेथील चॅम्पियन झिब्स्को याच्याशी कुस्ती करून त्यांस त्याने जिंकले. ह्या दिग्विजयानंतर तो हिंदुस्थानात परत आला. त्यांस पतियाळचे महाराजानी आपलेजवळ ठेविले व मासिक रु. २५० वेतन सुरू केले.

ह्या दोघांही श्रेष्ठ मल्लांच्या चरित्रावरून येवढे सार निघते की "मनुष्याचा निश्चय असला तर वाटेल ते वाटेल त्या परिस्थितीत त्याला साधता येते." गामाचे दारिद्र्य त्याची प्रगति अडवूं शकले नाही व झिब्स्कोची व्यायामाकडील प्रवृत्ति त्याच्या शिक्षणाने ऱ्हास पावली नाही. बौद्धिक श्रम करणाराला शारिरीक बल लाभत नाहीत ह्या समज झिब्स्कोने खोटा ठरविला व दारिद्र्यामुळे हवातसा खुराक मिळत नाही म्हणून शरीर कमविता येत नाही हा आक्षेप गामाने खोटा ठरविला. सुशिक्षित प्रौढ विद्यार्थी व खुराकीच्या अभावी तालीम शक्य नाही असे म्हणणारे तरूण इकडे लक्ष देतील काय ?

मे १९२८.

---

# सूर्य फिरूं लागला.

( लेखकः—“ पंडित.” )

पृथ्वी फिरते की सूर्य फिरतो हा वाद अेके काळी फार बोकाळला होता. शास्त्रज्ञांनी सूर्य फिरत नाही असे सिद्ध करून दाखविले तरी पण काही अगदी धर्ममार्तंड पृथ्वी ही स्थिर आहे सूर्यच फिरतो असे अजूनही ठासून सांगत आहेत. जी गती आकाशस्थ सूर्याची तीच गती स्वातंत्र्यसूर्याची आहे. स्वातंत्र्यसूर्य हाच फिरतो व चक्राकारे प्रत्येक राष्ट्रावर उदयाला येतो. पृथ्वी म्हणजे जनता स्थिर आहे, असे सांगणारे मवाळ मार्तंड आहेतच. जनता जागृत झाली व पारतंत्र्याच्या संरक्षकांवर “ फिरली ” ह्मणजे परवशतेची रात्र संपून स्वातंत्र्यसूर्य उदयाला येतो, जनता पृथ्वी “ फिरते ” स्वातंत्र्य सूर्य फिरत नाही हा राजकारणपटुशास्त्रज्ञांचा सिद्धांत आहे, त्याचा अगदी ताजा पुरावा ह्मणजे भाग्यवान चीन देश आहे.

१९०४–५ साली जपान देशाने रशियाच्या अस्वली शक्तीला नमवून पूर्वेकडील देशांच्या स्वातंत्र्याकांक्षा झळकविल्या व त्यामुळे स्वातंत्र्यसूर्याचे दर्शन होणार हा विश्वास सर्व पूर्वीयात–पूर्वेकडील देशात–अुत्पन्न झाला, व तेव्हांपासून प्रभातकाली आळसाचाचून सर्व उठून कार्याला लागतात, त्याप्रमाणे चीन, हिंद, अफगाणिस्तान, अिराण, आदि देश आपापल्या देशांत जागृत होअून स्वातंत्र्याच्या सुर्याला अर्घ्य देण्याची सिद्धता करू लागले, अुठल्यावर शुद्ध-

तेच्या विधींत अंगाचा मळ काढून टाकण्यासाठी आंग चोळून रगडावें लागते, त्याचप्रमाणे या पौर्वात्य देशांत शिथिल जगताला रगडून चमकून टाकण्यासाठी अनेक युवयुवतींना अपूर्व स्वार्थत्याग करावे लागले, चीननेंही हेच केले.

चीन देशांतील भित्र्या राजकारणीयांना बाजूला सारून डॉ. सत्य-सेन यांचा तरुणपक्ष पुढे झाला, व जपानात फांकलेल्या अरुण प्रभेच्यापुढे सहस्ररश्मी स्वातंत्र्याचें प्रत्यक्ष दर्शन चीनमध्ये व्हावें ह्मणून प्रयत्न करूं लागला. स्वार्थत्याग व पळीपंचपात्राने निश्चयाचा संकल्प सोडून स्वातंत्र्याच्या गायत्रीमंत्राचा अखंड जप चालू झालया-मुळे राष्ट्रीय सरकाराची स्थापना नानकीन येथे होऊन सूर्योदय झाला. व नंतर सर्व दुहीचा बीमोड होऊन ह्मटलेले उपस्थान संपूर्ण झाले, शेवटी " जीवेम शरदः शतम् " ह्मणून प्रार्थना चालू आहे.

चीन देशाचा विस्तार साधारणतः ५० लक्ष चौरस मैल ह्मणजे अमेरिकेच्या दुप्पट आहे, व लोकसंख्या सुमारे ४० कोटी आहे. ही एवढी प्रचंड शक्ती आजपर्यंत सुप्त होती व त्यामुळे इंग्रज, अमेरिकन, फ्रेंच, जपानी इत्यादि लोक हळुहळु चीन देशांत घुसले, व झोपलेल्या उतारूंच्या चारी बाजूस लाग पाहून चोरांनी बसावें व मिळेल ते घ्यावें तसे या राष्ट्रांनी केले, ज्या बंदरावर उतारू ह्मणून उतरले त्याच बंदरावर येणाऱ्या उतारू मालावर कर घेऊं लागले हा इतिहास आता सर्वविश्रुत आहे. ही परिस्थिती कळू लागताच तेथील तरुण वर्ग जागा झाला व या परकीयांनी बलात्काराने मिळविलेल्या

सवलती काढून घेण्याची चळवळ चालविली, त्यासाठी त्यांनी आपसात दुही पत्करली, वडिलांचा कोप पत्करला, प्रचलित सत्ताधाऱ्यांचा दंड सहन केला, परकीयांच्या कौटिल्यामुळे केव्हांकेव्हां सर्व जगाकडून नाक मुरडवून घेतले परंतु आपली स्वातंत्र्योपासना सोडली नाहीं व शेवटी पेकिंगच्या परावलंबी सत्ताधीशांना जिंकून नानकिंग येथे राष्ट्रीय सत्तेचा झेंडा फडकाविला व तात्काळ या जगांत अजेय समजल्या जाणाऱ्या इंग्लंडादि राष्ट्रांना आपापल्या गोमाजी गणेशी वसाहती उठवून नेण्याला निक्षून सांगितले आहे. याप्रमाणे जपानावर निरभ्र सूर्य अुदय पावला होता तो फिरत फिरत चीनवर आला आहे आणि ह्मणूनच हिंदभूमीतील तरुणांनी आता ताठ अुभे राहून अेकचित्त होअून स्वातंत्र्यसूर्याची अुपासना केली पाहिजे.

चीन देश हा बुद्धधर्मीय देश आहे...." Buddhism is now the dominant religion of China. It is closely bound up with the life of the people in a never-failing refuge in sickness or worldly trouble. It is no longer the subtle doctrine which was originally presented to the people of India but something much more clearly defined appreciable by the planest intellect."

[ गाईल्साहेब ह्मणतात बुद्ध धर्म हाच चिनी लोकांचा मुख्य धर्म असून तो लोकांच्या अगदी हाडीमांसी खिळला आहे, व ओहिक सुखदुःखातही तोच आधारभूत आहे. आर्यावर्तात प्रथम प्रवृत्त झालेल्या

प्रकारचा गूढतत्त्वपरायण आता हा धर्म राहिला नसून तो स्पष्ट आचारणीय व सामान्य बुद्धीला कळेल असा झाला आहे.]

यावरून चीनांच्या हाडीमांसी हिंदुत्वच खिळलेले आहे व त्यांनी आपल्या दीर्घ व निश्चित प्रयत्नांनी मिळविलेले स्वातंत्र्य हिंदवी तरुणांनी मिळविणे आवश्यक आहे. आपला वेदान्त आपणांस पौरुषहीन करतो असे ह्मणणाऱ्या वाचाळांना हे सांगितले पाहिजे की चीनांत तत्ववाद आपणांपेक्षां अधिक प्रमाणांत नेतिनेति हा त्याचां आवडता शब्द आहे ( गाईल्स पान १४४ ) पण त्यामुळे चीनच्या स्वातंत्र्यार्थ यज्ञांत उणीव आली नाही, चीनमध्ये स्त्रियांना काय किंवा पुरुषांना काय फारसे शिक्षण नाही तरी त्यांना स्वातंत्र्य मिळविता आले त्यांचेवर प्रत्यक्ष परकीय सत्ता नव्हती तरी परकीयांच्या गुप्त हातांवर अधिष्ठित असलेली दिखाऊ स्वदेशीय सत्ता जी प्रत्यक्ष परराष्ट्रापेक्षा अधिक भयंकर गाजत होती, सारांश स्वातंत्र्यार्थ यत्न करण्याचा निश्चय, ध्येयाची स्पष्टता व त्यासिद्ध्यर्थ करावयाचा अपूर्व स्वार्थत्याग यायोगेच चीनवर स्वातंत्र्यसूर्य प्रकाशला. सूर्य आतां फिरू लागला आहे. हिंदुस्थानांतील तरुणांनी निश्चित व धडाडीचे कार्य केल्यास हिंदुस्थानाची पाळी प्रथम येईल.

जनता पारतंत्र्यावर "फिरली" ह्मणजे सूर्य "फिरतो" हा सिद्धांत खरा आहे. या सिद्धांताला स्वकर्तृत्वाने पुष्टी देणाऱ्या चीनाला शतशः प्रणाम असोत.

आगस्ट १९२८.

# एक धडा.

(Matthew Arnold च्या Quiet Work वरून सुचलेले विचार)

(कविः—श्री. श्रीपाद सदाशिव शेवडे.)

(चालः—वीर शिरोमणि सकल धनुर्धर.........)

निसर्ग देवी ! मजसि शिकवि तूं एक धडा संगत
जो या सकल जगीं नांदत ।
ज्याच्या योगें विलया जाती दुःखाचीं तीं मुळें ।
व्यथाही होति नष्ट ज्यामुळें ।
तो अनुसरतां लघुतर होओी जीवनभर मानवा
गुरुतर सुखसंचय तेधवा ।
जो अक्षय्य असे फल देणारा श्रम
जो स्पर्धाविरहित कार्यांचा आश्रम
जो प्रशांत, परि नच आवेगाचें धाम
ज्या मनुज सर्वदा अशक्य अथवा दुर्बोधचि मानिती
मूढ ते ज्याल अवमानिती ॥१॥
'स्थैर्य राखुनी श्रम करण्या' जो* शिकवी सर्वां जनां
धडा तो पटवी तू मम मना ।
अनित्य मानव कामा नवनव नित्य अंगिकारिती
सर्व ती अपूर्ण मग राहती ।
अखंडजागृत सूर्यचंद्रतारकादि तव चार ते
तुझे जणु सशक्त आधार ते ।

---

* Of toil unseverd from tranquillty—*M. Arnold.*

ते स्वकार्य करिती स्थिरचित्ताने सदा
परि विश्रामाचा लवलेश न त्यां कदा
ते हंसति आमुच्या धडपडीस सर्वदा
मनुज प्राणी करुनि वृथा श्रम एक दिनी जाअिल
परि ते चिरकाल रहातिल ॥ २ ॥

## हृदय फुलास.

( कवयित्री—श्री. सरस्वतीबाअी. )

( चालः—श्रीहरिचे चरण कंठा ).

हृदय फुला बोल सदा, थांबु तूं नको ॥धृ॥
सर्व जगत रम्य तुला
थारा नच चिंतेला
हेवा तव सौख्याचा, का करू नको ॥१॥
चंचल ही तव दृष्टी
मधु शब्दांची वृष्टी
वर्षू दे सतत अशी, थांबवू नका ॥२॥
दृष्टीचे तेज अचल
मोहवीत सर्व काल
रम्य सुमा वाङ्मय तुझे संपवू नको ॥३॥

## तरुण भारत मंडळ, अमदाबाद.



डावी कडून उजवीकडे खाली बसलेलें कार्यकारी मंडळ:—२ श्री. स. शेवडे. ३ भा. स. शेवडे. ४ वि. मा. देशपांडे. ५ ग. र. वैशंपायन (अध्यक्ष) ६ द. वि. मठकरी. ७. म. रा. लिमकर. ८ ग. रा. वैद्य

॥ श्री समर्थ ॥

स्वदेश, स्वभाषा, व स्वधर्म यांची उत्तम सेवा करा.

# मंडळाचें पंचवार्षिक प्रतिवृत्त.

प्रतिवेदक :— वि. मा. देशपांडे, व. ह. हेगिष्टे, म. मा. मुनशी, श्री स. शेवडे, द. त्रि. मठकरी, र. ल. पवार, म. रा. लिमकर.

ऐन असहकारितेच्या भरांत म्हणजे इ. स. १९२३ साली गत वैभवाच्या स्मृतिदिनीं म्हणजे दसऱ्याचे दिवशी तरुण भारत मंडळाची स्थापना झाली. ही कल्पना काढण्यात श्री वि. पां. दांडेकर यांचा प्रामुख्याने भाग होता. मंडळ स्थापित करताना मंडळाचे ध्येय "तरुणांची सर्वांगिण उन्नति" हें होते; व त्याच्या सिद्धर्थ चर्चाविभाग नियत कालिक, स्वयंसेवक पथक अित्यादि उपशाखा काढून तसेंच राष्ट्रीय उत्सव साजरे करून कार्य करण्याचे ठरले आणि ठरल्या प्रमाणें मंडळाने चर्चाविभाग सुरु करुन मासिक काढून आणि स्वयंसेवक पथक स्थापून कार्यास प्रारंभही केला. त्यावेळीं चर्चाविभागाचे कार्य म. मा. मुनशी ह्यांनी घेतले, मासिक श्री. वि. मा. देशपांडे यांनी सुरु केले व श्री. व. ह. हेगिष्टे ह्यांनी स्वयंसेवक पथक चालू केले. त्या वेळी हेच कार्यकारी मंडळ होते. हे कार्य जेमतेम वर्षभर चालले तोच कार्यकारी मंडळींच्या पांगापांगीमुळे मंडळास शिथिलता

प्राप्त झाली; पण श्री. ग. र. वैशंपायन यांच्या १९२४ मधील आगमनाने भद्रेत जी मोठी क्रांति झाली आणि जिच्यातून म राष्ट्र समाजाचा जन्म झाला त्याच क्रांतिने मंडळाची पुनर्घटना केली; आणि ग. र. वैशंपायन, वि. मा. देशपांडे, श्री. स. शेवडे, आणि द. य. मराठे यांच्या अनुक्रमे अध्यक्ष, चिटणीस, चर्चामंत्री आणि खजिनदार या जागी निवडणूकी झाल्या व मंडळाचे कार्य जोराने सुरु झाले. परंतु एक महिना होतो न होतो तोंच श्री. वैशंपायन यांना येथून जावे लागले व त्यांच्या जागेवर श्री. धोंडो बाळकृष्ण रहाळकर हे निवडून आले. त्यांच्या कायिक श्रमाने आणि मनमिळाउ स्वभावाने मंडळाचा जोर वाढत जाऊन त्याच वर्षी, परस्परांच्या अंगावर रंग व धूळ उडविण्याच्या व अितर बीभत्स प्रकारास आळा बसावा आणि होळी व धुळवड यांस सुस्थित स्वरूप प्राप्त व्हावे या हेतूने होलिकोत्सव सुरु करण्यात आला. उत्सवात मोठया मुलांचे पौरुषीय खेळ त्याचप्रमाणे लहान मुलामुलींचे खेळ होऊन यशस्वी खेळांडूना श्री भट I. C. S. (आसिस्टंट कलेक्टर अहमदाबाद) यांच्या हस्ते पारितोषके देण्यांत आली. त्यांच्याच कारकीर्दीचा दुसरा विशेष म्हणजे श्री शिवाजयन्त्युत्सवाचा प्रारंभ होय. त्याप्रसंगी श्री शि. गो. भावे यांचे व्याख्यान, विद्यार्थ्यांचे पोवाडे व राष्ट्रगीतें, आणि आल्पांतिक पेयपान झाले. या पुढे श्री. रहाळकरांना अहमदाबाद सोडावे लागल्यामुळें अध्यक्षपदाचा मान श्री. के रा. भिडे यांना देण्यांत आला. त्यांच्या अमदानीतील मुख्य कार्य

म्हणजे संग्रहालयाची स्थापना होय. ह्या शिवाय आचार्य आठवले, आचार्य ना. सी. फडके, आचार्य आपटे, चिंचवडच्या स्वावलंबन पाठशाळेचे बाळकाका कानिटकर, राव साहेब बझे [नाशिक] अित्यादि मंडळीची व्याख्याने करवून ज्ञानगंगा अहमदाबादच्या वाळवंटात प्राप्त झाली असतां तिचा लाभ करुन घेण्याचा परिपाठ घालून दिला. श्री. भिडे यांच्यानंतर अनुक्रमे श्री द.वि बापट आणी श्री शि. गो. भावे यांच्या कडे मंडळाचे अध्यक्षपद होते श्री बापटांचा मनमिळाऊ स्वभाव आणि कार्याची आतुरता यामुळे ते अत्यंत लोकप्रिय झाले होते श्री भावे यांची कार्याविषची दक्षता आणि चोख कामगिरी वाखाणण्यासारखी होती श्री भावे यांचे नंतर श्री भोंदे मंडळाचे अध्यक्ष निवडले गेले यांच्या कारकीर्दी पासून मंडळाने राष्ट्रीय कर्तव्यास जागण्याचे पुढील पाऊल टाकल;व १९२६ च्या डिसेंबर महिन्यात खुनी—नव्हे गाजी(?) अबदुल रशीदने परमपूज्य श्रद्धानंदजीच्या केलेल्या खुना बद्दल प्रसिद्धपणे धिक्कार करण्यात आला. त्या सभेचे अध्यक्ष श्री दादासाहेब मावळंकर होते; व त्या धिक्कार-पत्रिका सर्व वृत्तपत्रांना पाठविण्यात आल्या ह्या सभेस श्री छगनलाल पंड्या हे उपस्थित होते.

ह्यांच्याच कालातील आणखी एकविशेष गोष्ट म्हणजे वैकुंठ चतुर्दशीचा कार्यक्रम महात्मा गांधी यांच्या आश्रमात झाला हा होय वैकुंठ चतुर्दशीच्या कार्यक्रमाच्या भोजन प्रसंगी श्री काकासाहेब कालेलकर, श्री दास्ताने श्री संगीता-

चार्य खरे इत्यादि महाराष्ट्रीयांनी पंक्तिचा लाभ मंडळाच्या सभासदांना दिला. भोजनोत्तर श्री काकासाहेब, श्री. दास्ताने इत्यादि मंडळीच्या बरोबर प्रश्नोत्तरे झाली व नंतर महात्माजींनी मंडळींची भेट झाल्या बद्दल आनंद व्यक्त करून खादि वापरण्याचा आणि सूत काढण्याचा उपदेश केला.

मंडळाने ह्या प्रमाणे चार वर्षें सारखी प्रगति केल्यावर दमल्यामुळेच जणूं काय मंडळ मंद चालूं लागले आतापर्यंतच्या सर्वच तेजस्वी शाखा मलिन झाल्या. पण ही मलिनता फारवेळ न टिकतां श्रीशिवाजीमहाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक उत्सवाच्या उत्साहाने पार उडून गेली श्री शिवाजी महाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक उत्सवाकारितां श्री. आबा देशपांडे, बाबा हेंगिष्टे, तात्या शेवडे, भाऊ पवार आणि नाना शेवडे या पांच मंडळांचे कार्यकारी मंडळ नेमण्यांत आले होते व त्यांनी अत्यंत परिश्रमाने तो उत्सव अहमदाबाद शहरास साजेसा साजरा केला. ह्या प्रसंगी येथील सर्व महाराष्ट्रीयांनी उदार हस्ताने देणग्या देऊन हिंदुपदपादशाहीच्या संस्थापकाविषयी आपला पूज्यभाव व्यक्त केला आणि स्वकर्तव्याची जाणीव दाखविली, हें सांगण्यास आह्मांस फार अभिमान वाटतो.

ह्या उत्सवप्रसंगी आचार्य द. वा, पोतदार (पुणें) रा. ब. महाजनी (अकोला), आचार्य आठवले, आचार्य राम नारायण पाठक, इत्यादिकांची व्याख्याने झाली आणि

आळेकर [ गोंधळी-बडोदे ] यांचे पोवाडे झाले त्याशिवाय येथील मंडळींचे प्रेक्षणीय पौरुषेय खेळ झाले.

मंडळाची कायमची मलिनता दूर करण्याकरितां पुनः कार्यकारी मंडळाची निवडणूक केली. त्यांत श्री. गोवडे, स. गो. जांभेकर, भोंदे, पवार हे अनुक्रमे संपादक चर्चामंत्री, संग्रहालय चिटणीस व स्वयंसेवक मंत्री नेमण्यांत आले; आणि श्री. स. शेवडे यास मुख्य मंत्री नेमून अध्यक्ष निवडले जाईपर्यंत अध्यक्षांचे अधिकार त्यांजकडे ठेवण्यांत आले होते. पुढे थोडयाच दिवसांत श्री ग. र. वैशंपायन हे वजिरिस्थानाहून येथे आले व मंडळाने अध्यक्षपदाची माळ त्यांच्या गळ्यांत घालून अत्यंत आनंदाने स्वागत केले. अगोदरचे मंडळाचे मालिन्य नष्ट होऊन मंडळ कार्यास लागले होते, त्यात श्री. वैशंपायन सारख्या जिवंत तेजस्वी स्फूर्तिच्या अध्यक्षाची जोड, मग काय ? तरुण भारतांत निराळीच परंतु आशादायक अशी नवीन चेतना दृष्टीस पडू लागली. मंडळ राष्ट्रीय कर्तव्यास जागू लागले; व जिवंतपणाची आणि स्वाभिमानतेची पहिली पायरी म्हणून श्रीशिवभास्करावर थुंकणाऱ्या दिल्लीच्या पाजी 'पेशवा' पत्राचा निषेध करण्यात आला. त्यानंतर परवाच्या गोधऱ्याच्या दंग्यात, मुसलमानांची पूर्वसिद्धता आहे हे सरकारी अधिकाऱ्यांना माहिती असताना त्यांनी दाखविलेल्या निष्काळजीपणाबद्दल तीव्र निषेध व्यक्त केला. अशा रीतिने मंडळाने जिवंतपणाची खूण म्हणून कठोर राष्ट्रीय कर्तव्य बजाविण्याचे सुरु

केल्यावर राष्ट्राच्या भवितव्यतेसाठी ज्या सभांतून चर्चा होत असते ज्या एखाद्या व्यक्तिवर राष्ट्राची भवितव्यता अवलंबून असते, त्या सभांविषयी शुभेच्छा प्रदर्शित करणे त्या व्यक्तीचे अभिनंदन करणे हेही पण राष्ट्रीय कर्तव्यच ठरते, व हे कर्तव्य मंडळाने जगप्रसिद्ध गामा यास तार पाठवून आणि मुंबईच्या युवक परिषदेस तार पाठवून चोखपणे बजाविले हे सांगण्यास आनंद वाटतो.

या नंतर १९२८ सालांतील मुख्य चळवळ म्हणजे एतद्देशीय खेळांना प्रोत्साहन देणे ही होय. एतद्देशीय—आट्यापाट्या, खो खो, हुतुतु इत्यादि—खेळ लोकप्रिय करण्याचे श्रेय क्रीडाविभागाचे मंत्री श्री० श्री. स. शेवडे यांजकडेच सर्वस्वी आहे. प्रतिदिन सायंकाळी क्रीडांगण तरुणमंडळींनी अगदी फुलून गेलेले असे.

कोणत्याही चळवळीला शंका टीका आणि संमति या तीन पायऱ्या असतात—तेव्हा अर्थात आमच्या मंडळाच्या चळवळींसुद्धां ह्याला अपवादात्मक होत्या असे नाहीं. परंतु मंडळातर्फे चालत असलेल्या नियतकालिक सिंहनादाला परतवाडा [ वऱ्हाड ] येथे हस्तलिखित मासिकांच्या प्रदर्शनात प्रथम पारितोषिक मिळाल्याचे ह्याच वेळी जेव्हां 'केसरींत' प्रसिद्ध झाले तेव्हा मंडळ शंका आणि टीका ह्या पायऱ्या चढून संमतीच्या पायरीवर येऊन बसले; आणि सिंहनादाकडे सर्वच लहानथोर, विद्यार्थी-विद्यार्थिनी आपभावाने पाहू लागले व लेखही जरा अपेक्षेपेक्षा अधिक

येऊ लागले. सिंहनादाच्या लेखकांचा इतका उत्साह वाढ ल्यावर उत्साहाला ध्येयाचे वळण लाविण्याकरिता लेखक लेखिकांचे संमेलन भरविण्यात आले व पुष्कळ विषयांची कळकळीने चर्चा करण्यात आली.

प्रतिवर्षीचा होलिकोत्सव फार चांगल्या तऱ्हेने करण्यात येतो, त्यांतले त्यांत ह्या वर्षीचा (१९२८) तर फारच मोठ्या प्रमाणात करण्यात आला. उत्सवप्रसंगी खेळाडूना आणि मुलामुलींना श्री. शेट्ये (चीफ ऑफिसर अहमदाबाद म्युनिसिपालटी) यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली.

प्रतिवर्षाप्रमाणे यंदाचा श्रीशिवजयन्त्युत्सवही फार आनंदाचा झाला उत्सवप्रसंगी श्री. करखानीस (आश्रम) यांचे प्रवचन आणि श्री. महाबळ (नाशिक) यांचे कीर्तन व पोवाडे इत्यादि कार्यक्रम होता.

श्री. वैशंपायन यांच्या कारकीर्दीत लेखक व लेखिकांच्या संमेलनाची जशी एक अपूर्व गोष्ट झाली तशी दुसरी म्हणजे मंडळाच्या सभासदांचे पंचवार्षिक संमेलन ही होय; ह्या संमेलनात मंडळाच्या मागील कार्याचें सिंहावलोकन व भावी धोरणाविषयी आणि मंडळाच्या स्थापनेविषयी चर्चा झाली त्या संमेलनाचे छायाचित्र आजच्या अंकात दिलेच आहे.

यानंतर प्रतिवर्षाप्रमाणे मंडळाचा वार्षिकोत्सव नेहमीच्या थाटाने श्री. दादासाहेब मावळंकर ह्यांचे अध्यक्षते खाली पार पडला.

आतापर्यंत मंडळाचा पंचवार्षिक वृत्तांत झाला. इतकें झाल्यावर आता आपण मंडळाची घटना, कार्यकारी मंडळ व सर्व विभाग यांचा क्रमवार इतिहास पाहूं.

मंडळाचे आता चर्चाविभाग, सिंहनाद, संग्रहालय, व व्यायामविभाग हे चार पोटविभाग आहेत व त्यांचे प्रत्येकीं एक एक मंत्री, दोन मुख्य मंत्री आणि अध्यक्ष मिळून एकंदर सात जणांचें त्याचें कार्यकारीमंडळ आहे. त्यां सर्वांचा त्रोटक इतिहास व वेळावेळच्या कार्यकारी मंडळानें आतापर्यंत केलेल्या कार्याचें आपण परिशीलन करूं.

अध्यक्षः—मंडळाच्या सर्व चळवळींवर यांची देखरेख असते व आतापर्यंतचे मंडळाचे सर्व अध्यक्ष या स्थानास पात्र असेच होते. त्यांचीं नांवें:—श्री. ग. र. वैशंपायन, धों. कृ. रहाळकर, के. रा. भिडे, द. वि. बापट, शि. गो. भावे, पु वा. भोंडे. या सर्वांचे आभार मानण्याचें पवित्र कार्य करण्यास आम्हांस आनंद होत आहे.

मंत्रीः—पहिलीं चार वर्षे मंडळाचा एकच मुख्य मंत्री असे. परंतु ह्या वर्षापासून (१९२८) मंडळाचा व्याप वाढल्यामुळें मुख्य मंत्र्याला दुसरा साह्यकारक उपमंत्री दिला आहे. मंडळाच्या सर्वच चळवळीस मुख्य मंत्री उत्तरदायी असतात. आणि त्याप्रमाणें मंडळाच्या आजपर्यंतच्या सर्व मंत्र्यांनीं आपलीं कार्यें उत्तम रीतीनें पार पाडिलीं आहेत. त्यांचीं नांवें:—श्री. वि. पा. दांडेकर, वि. मा. देशपांडे, ग. ल. पवार, म. मा मुनशी, न. ह. हेगिष्टे, कृ. ग. पुसा-

ळकर, श्री. स. शेवडे, म. ग, तळवलकर, द. वि. मठकरी, म. रा. लिमकर, वि. ग. चांदोरकर, वि. रा. जांभेकर.

चर्चाविभागः—मंडळीना आपापले विचार निर्भीडपणे आणि सुसंघटितपणे जनतेपुढे मांडता यावे या उद्देशाने हा विभाग मंडळाने सुरू केला—हा विभाग यशस्वी करण्यासाठीं आजपर्यंत ज्या निरनिराळ्या मंडळ्यानीं परिश्रम केले त्यांचीं नांवें:— श्री. वि पां. पेंडेकर, म. मा. मुनशी, गो. मा. देशपांडे, वि मा. देशपांडे, श्री. स. शेवडे, के रा. भिडे, कृ. ग. पुराळकर, म. रा. लिमकर, स. गा. जांभेकर आणि भा. स. शेवडे.

ह्यापैकी शेवटल्या मंडळ्यानी विभागाला पुष्कळच सिद्धि प्राप्त करून दिली हे येथे नमूद करण्यास फार आनंद वाटतो.

सिंहनादः—सिंहनाद हे नियतकालिक अगोदर श्री. त्रि. मा देशपांडे स्वतंत्रपणे चालवीत असत. पण पुढे ते मंडळाचे सभासद झाल्यावर मंडळ तर्फे त्यांच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध होऊं लागले. प्रथम ते नियतकालिक होते पण गेली दोन वर्षे ते त्रैमासिक केले आहे. ज्यानी हे लेखनकार्याचे लोण आजपर्यंत स्वकष्टाने आबालवृद्धांस पोचवले त्यांची नावे अशीः—श्री. त्रि. मा. देशपांडे, श्री. स. शेवडे, स. शं. बेलसरे, के रा. भिडे, शं कृ. गोवंडे, अ. स. गोडे व (पुनः) त्रि. मा. देशपांडे.

## सिंहनाद.

सिंहनाद व्यवस्थेशीर चालविण्याचे बाबतीत आणि भावी महत्वाकांक्षेला धरून संपादक वि. मा. देशपांडे यांनी संवादकोश मंडळाची नवी योजना मंडळापुढे मांडली व ती मान्य करून घेतली. संपादकांची ही योजना जर यशस्वी रीतीने पार पडली तर हा विभाग निराळीच क्रांति घडवून आणून 'सिंहनाद' हे लोकप्रिय मासिक होईल असे आम्हास वाटते.

संग्रहालयः—स्वदेशी वस्तूंचा प्रचार हेच ह्या शाखेचे ध्येय आहे. ह्या शाखेची स्थापना १९२३ साली झाली. स्थापना प्रसंगी संग्रहालयाचे भांडवल रु. ५ होते. सध्या त्याच शाखेचे भांडवल रु. १०० हून जास्त आहे. ह्यावरून ह्या शाखेच्या प्रगतीची गती कोणासही सहज लक्षात येईल. ही शाखा स्वदेशी वस्तू विकते इतकेच नव्हे तर आज्ञेप्रमाणे मालाचा पुरवठाही करिते. ज्यांनी ज्यांनी ही शाखा ऊर्जितावस्थेला आणण्यासाठी यत्न केले त्या मंत्र्यांची नांवे:—श्री. स. शेवडे, म. मा. मुनशी, ए. ग जांभेकर, श्री. रा. जांभेकर, प्र. गो. ठकार, वि. रा. जांभेकर, व. ह. हेगिष्टे, पु. वी. मोरे, द. ग. कार्णिक आणि ग. रा. वैद्य.

स्वयंसेवक विभाग अथवा व्यायाम विभागः—ह्या विभागाचे कार्य मंडळाच्या स्थापनेपासूनच चालु होते. हा विभाग श्री. व. ह. हेगिष्ट आणि र. ल. पवार यांनी पुष्कळ दिवस पर्यंत चालविला—परंतु जेव्हा श्री. स. शेवडे व्यायाम-मंत्री झाले तेव्हा परदेशी खेळांना खो देण्याकरिता खोखो

सारखे परदेशीय खेळ सुरू केले. ह्या विभाग नावलौकिकाला आणण्याचे सर्वस्वी श्रेय श्री. स. शेवडे यांजकडे आहे.

मंडळाचे दैवतः—तरुणभारत मंडळाचे दैवत सबंध महाराष्ट्र जागृत करणारे श्रीशिवछत्रपतींचे गुरु श्री समर्थ रामदास हें होय.

उत्सव इत्यादिः—मंडळाचे ध्येयानुसार क्रांतिकारक विभूतींची स्मृति सदा रहावी आणि लोकांची ताजी करावी ह्या उद्देशाने विवेकानंद, श्रीसमर्थ रामदास, हिंदुपदपादशाहीप्रणेताश्री शिवाजी, लोकमान्य टिळक इत्यादि विभूतींचे उत्सव करण्यात येतात. व संघटन चेतना आणि चळवळ कायम रहाण्याकरिता विजयादशमी, वैकुंठचतुर्दशी, मकरसंक्रमण, होळी इत्यादि प्रसंगी समारंभही साजरे करण्यात येतात.

समालोचनः—गंगेच्या उगमाप्रमाणे ह्या मंडळाचा उगम प्रथम हाताच्या बोटावर मोजण्या इतक्या ठिपक्यानी —सभासदानी—झाला. व आजचे मंडळाचे मोठे स्वरूप—कारण आज ह्या मंडळात १०० वर सभासद आहेत—व दिवसेंदिवस होत गेलेल्या मंडळाच्या भरभराटीचा इतिहास आपणापुढे ठेविला आहे.

मंडळाच्या ह्या भरभराटीस कार्यकर्ती मंडळी जशी कारणीभूत आहेत, मंडळीच्या विस्तीर्णपणास जसे सभासद कारणीभूत आहेत तसेच मंडळाच्या नावलौकिकास

मंडळाच्या महत्वाकांक्षांना उत्साह देण्यास आश्रयदाते कारणीभूत आहेत हें सांगण्यास आम्हास आनंद वाटतो. सध्यां मंडळाचे १५० वर आश्रयदाते असून ते मंडळास फार प्रमाणांत मदत करीत असतात. यांचेकडून जमलेल्या पैशावरच महत्वाचे उत्सव साजरे होतात त्या सर्वांना वार्षिकमहोत्सवप्रसंगी मुद्दाम निमंत्रण करून त्यांचे स्वागत हीं केलें जातें.

शेवटीं ज्यांनी ज्यांनी तनमनधनें करून मंडळास साह्य केलें त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून, मंडळ राष्ट्रविमोचनार्थ, स्वधर्मरक्षणार्थ, आणि स्वभाषा जिवंत ठेवण्यार्थ ह्यापुढेंच मार्ग अवलंबण्याकरितां सामर्थ्यवान होऊन, चिरंजीव होवो, अशी श्रीसमर्थचरणीं प्रार्थना करून हें मंडळाचें अष्टवार्षिक प्रतिवृत्त संपवितो.

ता. ३-१-१९२९

संपादक.

# मृत्यूनेंच चिरंजीव केलें.

**ले-श्री. ग. रा. वैद्य.**

जन्म आणि मृत्यु! दोन शब्द वर वर पहाणाऱ्याला आणि विचार करणाऱ्याला त्या दोन शब्दांतील स्थितीत भिन्नता भासते. जन्मात गोडी वाटते आणि मृत्यूंत कडू जहरीपणा वाटतो. मूल जन्माला आले कीं आपण माणसे मोठ्या आनंदाने उत्सव करितो आणि एखादा स्नेही सोबती किंवा कौटुंबीय आप्त मृत्युवश झाला की आपण दुःखातिशयाने भयंकर आक्रोश करितो अशा प्रसंगीः—

मरे एक त्याचा दुजा शोक वाहे ।
अकस्मात तोही पुढें जात आहे ।।

हा श्रीसमर्थ रामदासस्वामींचा इषारा कोणीच विचारांत घेऊ शकत नाहीं. मृत्यू कां? तर जन्म झाला म्हणूनच ना? अर्थात जन्म हाच मुळी मृत्यु असे स्पष्ट सिद्ध होते. आपण संसारी माणसे दर वर्षाच्या प्रथम दिवशी एकमेकास 'नवीन वर्ष सुखाचे जावो' असे शुभेच्छेचे संदेश धाडितो, एखाद्याच्या जन्मदिवशी असेच त्याचे अभिनंदन करितो आणि 'शतायुर्भव' आशीर्वादाचा वर्षाव करितो. राजे बादशहांच्या जन्मतिथीचा थाटमाट काय विचारावा? लोकांची धडाधड, सैन्याची हडेलहप्पी, मिरवणु-

कींचा व दरबाराचा आटारेटा, पदवीदानाची रेलमेज वाद्यांचा सुकाळ, वगैरे धामधूम सर्वत्र माजते, परंतु या सर्व उत्साहाचें मूळ शोधून पाहिले तर एवढेच प्रत्ययाला येते कीं आम्ही माणसे जन्मगांठीचा उत्सव साजरा करीत नसून अमुक एखादा मृत्यु-गांठीत अडकण्यासाठीं किती वर्षे पुढे सरकला, याचीच जाहीर उत्सवाने मोजदाद करीत असतो. गर्भाशयाची गांठ सोडून किंवा तोडून प्राणी जन्मास आला का एक क्षणाचाही विलंब न लावता तो मृत्यूच्या मुखात अडकतो, जन्माची घडी हीच जर मृत्यूच्या मुखात पाहिली उडी तर ‘ चिरंजीव ’ हा शब्द अस्तित्वांत आला तरी कसा ?

या भूतलावर शेकडो वीर व वीरांगना होऊन गेल्या मृत्यूने त्यांचे नश्वर देह जरी मटकावले तरी त्यांच्या लोकोत्तर चारि-त्र्याच्या महिम्याचे तेज सर्वभक्षक काळाला यत्किंचितही मंद करिता आले नाहीं उलट त्याची उत्तरोत्तर वृद्धीच होत आहे. ‘जगला कोण आणि मेला कोण ?’ ‘ स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् ’ असे नीतिकारांनी या प्रश्नाला उत्तर दिले आहे. जो जगाला जगविण्यासाठी मेला, कालवश झाला तो ‘ मेला ’ म्हणण्यापेक्षां ‘ चिरंजीव जगला ’ असेच म्हटले पाहिजे.

हिंदु धर्म आणि हिंदुत्व जगविण्यासाठी श्रीछत्रपती शिवराय अवतरले, ते निसर्गधर्मानुसार कालवश झाले. पण त्या

लोकोत्तर हिंदुत्वामुळे ते अखिल हिंदूंच्या हृदयांत चिरंजीव होऊन बसलेच ना? पावनखिंडीत बाजी प्रभु ठार झाले पण मृत्यूनेच त्यांना चिरंजीव केले, सवाई शिव असा शंभु छत्रपती स्वदेहाचे तिळातिळ तुकडे पाहून अनुभवून मेला—धर्मांध औरंगजेबा-समक्ष हिंदुधर्मासाठीं ठार झाला, पण अखेर त्या अमानुष मरणानेच तो चिरंजीव झाला.

तद्वतच २३ डिसेंम्बर १९२६ रोजी महात्मा श्रद्धानंद स्वामीचा दिल्ली राजधानींत जो खून झाला त्या खुनाने त्या मृत्यूनेच त्यांना चिरंजीव केले.

स्वामी श्रद्धानंद बरे होऊन उठत असलेल्या दुखण्यांतच जर मृत्युवश झाले असते तर मामुली वहिवाटीला अनुसरून 'शोचनीय मृत्यू' ह्या सदराखालींच त्यांचा मृत्यू जगजाहीर झाला असता, पण त्यांचा मृत्यु रक्तपातांत झाला, ते आपल्या कार्यासाठीं सर्वसंग परित्याग करून संन्यासी झाल्यावर 'शुद्धिसंघटनाचे विहित कार्य बजावीत असता रिव्हॉल्वरला बळी पडले !

भरतखंडाची दिल्ली राजधानी धर्माखातर त्यांच्या छातीतील रक्ताने रंगली, ती अशोकाची धर्मभूमी धर्मासाठी लाल चुनडी नेसली. हर्षाची ती धर्मसमन्वय—भूमिका त्यांच्या रक्ताच्या पिचकाऱ्यानी शोकाकुल झाली.

हिंदूंच्या भवितव्यतेला, चक्राच्या क्रांतीला विलक्षण झटका देणारी ही दिल्ली आपल्या रक्तांनी चिंब भिजवून श्रद्धानंदांनी

आज अखिल हिंदु जनतेच्या हातांत त्यांच्या अस्तित्वाची गुरु-किल्ली दिली केवढी ही थोर कामगिरी !

स्वामी श्रद्धानंदासारखा मृत्यू कोणाला मरून मिळावयाचा नाही, असा मृत्यू देवाजवळ मागून मिळावयाचा नाही, श्रद्धानंदांचा मृत्यू हेवा करण्यासारखा आहे. श्रद्धानंदांचा मृत्यू हिंदुत्वाच्या मृत्यूला टाळण्यासाठी झाला. हिंदुत्व जगावे ह्मणून श्रद्धानंद मृत्युवश झाले हिंदुधर्मीयांचे रक्त अतःपर परधर्मीयांच्या जळवांनी शोषू नये ह्मणून श्रद्धानंदजींनी आपल्या रक्ताच्या ओंझळी अिस्लाम धर्माच्या पापावर ओतल्या, वेदानुयायी प्रामाणिक आर्य हिंदूंचे रक्त किती शुद्ध आणि विकल्पातीत असते त्याचे प्रत्यंतर स्वामी दयानंदाच्या शागीर्दाने पुन्हा अेकवार अिस्लामधर्माच्या प्रत्ययाला आणून दिले. श्रद्धानंदजींच्या खुनाने हिंदुत्वाचा खून टाळला, असा मृत्यु असा खून—असा रक्तपात—असे उज्वल लेणे पांघरून स्वामी श्रद्धानंद देहाने जरी नष्ट झाले तरी कीर्तीने अमर झाले, स्वामी श्रद्धानंदजींना त्यांच्या मृत्यूनेच त्यांच्या चारित्र्याला भारतेतिहासाच्या सुवर्णपृष्ठावर चिरंजीव करण्याची अमूल्य संधी आणून दिली.

**धन्य धन्य स्वामी श्रद्धानंद आणि धन्य त्यांचा मृत्यू !**

**जानेवारी १९२८**

# स्फुट-विचार.

आजकालच्या स्वातंत्र्ययुगात पहावे तो जो तो आपऱ्याच तोऱ्यात व मिजाशीत असलेला दिसतो. पुणें मुंबईला तर अवंगुण विशिष्ट लोकांचा सुकाळ आहे. अखाद्या डॉक्टराची प्रॅक्टिस् कुठे दोन दिवस बरी चालली की तिसऱ्या दिवशी नाक वर करून 'विझिट' ला येण्यास आता फुरसत नाही ह्मणून त्यांनी रोग्याच्या संबंध्यास सांगितलेच समजा. अखाद्या वकीलाला एका महिन्यांत बऱ्यापैकी पैसे मिळाले की दुसऱ्या महिन्याच्या सुरवातीस त्याने अशीलाशी 'नाक शेंदारुनी नयन फेंदारुनी, (चष्म्यातून) बोलण्यास सुरवात केलीच. अखादे एम. ए. गृहस्थ वरील हुद्देदाराच्या अकाली मृत्यूने लेक्चररच्या हुद्यावरून ऑसिस्टंट प्रोफेसरच्या हुद्यावर चढले की घरात व बाहेर मोठ्या काचांचा चष्मा घालून फिरायला लागायचे व आणखी पुनः सर्वांवर वरचष्मा गाजवायला तयार. एखाद्या गायकानें अखादे पद अखाद्या जलशाला थोडे खुमारीदार ह्मणून तेथील प्रेक्षकांकडून थोडी वाहवा मिळविल्यास दुसऱ्या दिवसापासून तो तानसेन होऊन जातो. एखाद्या चित्रकाराचे

एखादे चित्र दैववशात् बरे झाल्यास व ते चित्रमयजगत्च्या अंकांत छापले गेल्यास अंक बाहेर पडल्याबरोबर दुसऱ्या महिन्यास तो आपण चार बोटें वाढलो असे समजून स्वर्ग आता आपणास काय तो दोन बोटेंच उरला ओह असे समजू लागतो व आपण सर्व जग एकाच बोटावर खेळवू असा वृथाभिमान बाळगतो; व अशा समयी कोणी भेटावयास अगर एखादे चित्र काढवून घेण्यास गेल्यास त्याला निराश करूनच परत पाठवितो. असे हें आजचे युग आहे व याला अमदाबाद देखील अर्थात्च अपवाद नाही. आह्मी लहानपणीं ऐकत होतों की अहमदाबाद या नावातच एक जादू आहे. ती ही की येथे आल्यावर मनुष्य ' अहंमदा 'ने फुलून जातो. तेव्हां अमदाबादकरांनो, संभाळा बरें. हा आरोप खोटा आहे असे दाखविण्याची कामगिरी व जबाबदारी तुमच्यावर येऊन पडली आहे.

( टिळक अंक १९२८. )

* * *

मुंबईच्या कोर्टांत नुकतेंच घडून आलेलें गोंडलप्रकरण। आता सर्वांच्या तोंडी झालेंचं आहे. केसरीकारांनी त्या प्रकरणावर एक अग्रलेखच लिहिला आहे. आह्मी ह्मणतो आता तरी आपले लोक जागे होतील काय ? श्री० केळकरांनी येथे असतांना हिंदुसंघटनावर एक व्याख्यान दिले होते व त्या वेळेस हिंदूंचा फाजील धर्मलंडपणा आपल्या समाजास किती घातक होत आहे याचे विस्तृत विवरण

केले होते. बालविधवांना पुनर्विवाह केल्यास त्या धर्मबाह्य व समाजबाह्य होतात ही एक दुःखाची गोष्ट आहे आणि असे असल्यामुळे ज्यांना पुनर्विवाह करण्याची परवानगी मिळत नाही अशा विधवा परधर्मात गेल्यास नवल ते कोणते? आपण असेच निद्रिस्त राहिल्यास नीतिमत्तेचे वाभाडे निघतील नाही तर काय होईल?

( टिळक अंक १९२५. )

*　　*　　*

सप्टेंबर महिन्यांत तरुणभारतमंडळातर्फे प्रसिद्ध महाराष्ट्रीय वाग्भट प्रो० नारायण सिताराम फडके यांचे 'स्वभाषासेवा' या विषयावर व्याख्यान झाले. त्यांचे भाषण मुद्देसूद व मनोरंजक झाले. त्यांचे भाषणांत भाषेचे विलास व तिच्या अथांगसागरात चालत असलेले विहार पदोपदी दृष्टीस पडत होते. दृष्टान्ताचे वरचेवर फवारे उडवून भाषेला ते अत्यंत लीलेने जणूं काही खेळ-वीत होते. त्यांच्या भाषणांतील मुख्य मुद्दा असा होता की आजकाल महाराष्ट्रांत जी भाषेच्या शुद्धीकरणाची लाट एका सुप्र-सिद्ध देशभक्ताने उत्पन्न केली आहे ती अत्यंत आवश्यक आहे. परंतु वरील देशभक्ताने ज्या दिशेने प्रयत्न चालविला आहे त्या दि-शेने ह्मणजे स्वभाषेमध्ये जे परकी शब्द घुसले आहेत त्यांना हुसकावून देऊन स्वभाषाशुद्धी होणार नाही; तर परकीय भाषेतील जे शब्द आपल्या भाषेतील शब्दांपेक्षा जास्त सयुक्तिक व सुटसु-

टीत असतील ते आपल्या भाषेत घेऊन व त्यांच्या अंगावर आपल्या भाषेचा पहेराव चढवून त्यांना आपलेसे करावे व ह्याच पद्धतीने भाषेचे खरे शुद्धीकरण होईल. अशा विचाराचे भाषण झाल्यावर सभेचे अध्यक्ष श्री० दादासाहेब मावळणकर यांनी परकीय भाषेंतील शब्द घेताना धेडगुजरीपणा करू नका व बोलण्यात आणि लिहिण्यात स्वभाषाच वापरण्याचा परिपाठ ठेवा इतकेंच नव्हे तर परकीय भाषेतील अेकही शब्द वापरूं नका अशा अर्थाचे चार शब्द सांगून समारोप केला.

**दिवाळी अंक १९२५**

× × × ×

ह्यानंतर दुसऱ्या दिवशी प्रो. वि. मा. आपटे यांचे अध्यक्षते खालीं कै. डॉ. भांडारकर यांची पुण्यतिथि साजरी करण्यांत आली. त्याप्रसंगी व्याख्याते प्रो० आठवले यांनी डॉक्टरसाहेबांच्या गुणवर्णनपर भाषण केले. ते ह्मणाले आज आपण वाङ्मयश्राद्ध करीत आहोत. कै. भांडारकर हे आजच्या संस्कृत जाणणाऱ्या तरुणांना व बहुतेक लोकांना आजोबाप्रमाणे होते. तेव्हां आज आपण सर्व त्यांचे श्राद्ध करीत आहोत. डॉ० भांडारकर ह्या व्यक्तीबद्दल प्रत्येकाचे मनातील आदर उचंबळून येत नसला तरी तो थोड्याबहुत प्रमाणांत प्रत्येकाचे मनांत आहे ह्याबद्दल वाद नाहीं. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाले तर अंसे ह्मणता येईल कीं जरी पंचाय-

तनात त्यांना स्थान नसले तरी ते देव्हाऱ्यांतील देवापैकी अेक होत हे खास. अस्तु. त्यांची सामाजिक सुधारणा, मानसिक बळ, नैतिक व धार्मिक प्रवृत्ति तसेच त्यांचा विद्याव्यासंग ही फार अचाट होतीं. अशा रीतीने संदर्भादाखल मधूनमधून काहीं उतारे वाचून दाखवून प्रो० आठवले यांनी विस्तृत भाषण केले.

दिवाळी अंक १९२५

× × × ×

यंदा येथील गुजराथ कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. हेमिल रजेवर गेल्यामुळे त्याचे जागी प्रो. डिवेटिया यांची नेमणूक करण्यांत आली. प्रो. डिवेटियांची कारकीर्द कॉलेजच्या इतिहासात अत्यंत महत्त्वाची ( epoch-making ) होय. प्रिन्सिपालची जागा स्वीकारल्यापासून त्यांनी कॉलेजमध्ये बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या असून प्रत्येक कार्यांत ते फार उत्साहाने भाग घेतात. येथे लॉ कॉलेज काढण्याबद्दलची खटपट त्यांनीच सुरू केली आहे व ती लवकरच यशस्वी होवो अशी आमची अिच्छा आहे. हा सर्व हिंदी प्रिन्सिपाल असण्याचा प्रत्यय होय. लवकरच जिकडे तिकडे सरकारी कॉलेजात हिंदी प्रिन्सिपाल नेमल्यास जनतेचे बरेच हित होईल असे विधान करण्यास आम्हास मुळीच हरकत वाटत नही.

दिवाळी अंक ७९२५

× × × × ×

प्रतिवर्षी नव्हेंबरच्या ११ तारखेला होत असलेला प्रकार पाहून साश्चर्य हंसूंच येते. गेल्या नव्हेंबरच्या ११ तारखेस महा-युद्धानंतर झालेल्या तहाला पुरी सात वर्षे झाली. तह झालेल्या दिवसापासून प्रतिवर्षी ११ नव्हेबर हा आर्मिस्टिक डे मानण्यांत येतो. ह्या दिवशी दुपारी ११ वाजता दोन मिनिटपावेतो सर्व सरकारी व कांही अितर कचेऱ्यांत कामे बंद ठेवून सामसूम कर-ण्यांत येते. यामुळे अकराचे सुमारास चाललेल्या भाषणांतील वाक्ये अकराचे ठोके पडतांच अपुरी राहण्याचे व अितर अनेक हास्यजनक प्रकार बऱ्याच ठिकाणी दृष्टीस पडतात. गुदस्तांपर्यंत हा प्रकार रेल्वेत बोटीत चालू असे व त्यामुळे बरीच गैरसोय होत असे परंतु हल्ली ते बंद करण्यात आले आहे. असे वाटते की त्या दिवशी एकतर कचेऱ्या अजिबात बंद ठेवण्यात याव्या अगर ११॥-१२ वाजता अुघडण्यात याव्या परंतु या पोरकट प्रकाराला आळा बसावा.

(संक्रांत १९२८)

× × × × ×

मराठी भाषेच्या शुद्धीकरणाची बॅ० सावरकर यांनी सुरू केलेली चळवळ सर्वांस विदित आहेच. गेल्या अेप्रिलपासून केस-रीत वेळोवेळी येत गेलेली त्यांची लेखमालाही बहुतेकांनी वाचली असेलच. त्यांचा लेखांचा निष्कर्ष काढावयाचा झाल्यास तो असा काढता येईल की मराठी भाषेत आजपावेतो घुसलेले

अुर्दू व मुसलमानी शब्द तसेच अिंग्रेजी शब्द काढून टाकून त्यांचे अैवजी तदर्थक मराठी अथवा संस्कृतोद्भव शब्दांची योजना शक्य तो करावी. शक्य तो याचा अर्थ असा की जे शब्द आपल्यांत पूर्वी रूढ नसलेल्या वस्तूंचे वा कल्पनांचे निदर्शक असतील उदा. (खुर्ची, टेबल, कोट, कॉलर, मेज इ०) ते सुखेनैव राहू द्यावेत. संवयीमुळे काही शब्द उदा० हवा, रजा, अिसम, शिवाय, तयार, हजर, नजर, आजतागायत, हुशार, अक्कल, माफी, यादी, पारिग्राफ इ० ) तोंडाला इतके बसले आहेत की त्यांचा समानार्थक शब्द ( अनुक्रम—वायु, निरोप, मनुष्य, विना, सिद्ध—सज्ज, विद्यमान, दृष्टि, आजपावेतो, चाणाक्ष, बुद्धि, क्षमा, टिपण, छेदक इ० ) प्रयोगात आणणे कठीण जाईल. तरीपण त्या दृष्टीने प्रयत्न होणे अिष्ट अवश्य ( जरूर नव्हे ), व अपरिहार्य आहे.

बॅ० सावरकरांनी गुजराथेत अुर्दू शब्दप्रयोग ( उ० 'प्रभु' 'अीश्वर' 'अैवजी' 'मालक' 'मालिक' ) करण्याची प्रवृत्ति अधिक दिसते असे लिहिले आहे. आम्ही एक पाऊल पुढे जाअून असेही म्हणतो की येथील दक्षिणी मंडळींना मराठीभाषेत गुजराथी शब्द ( उदा० पथारी, टुक्यांत, रिवाज, बंधारण इ० ) योजण्याची अनिष्ट संवय आहे. गुजराथी भाषा मराठीप्रमाणेच संस्कृतोद्भव असून त्या दोन्ही भाषा सख्या बहिणीप्रमाणे आहेत ही गोष्ट आम्ही मान्य ( कबूल नव्हे ) करितो. परंतु आम्ही म्हणतो निर्मिश्रित भाषा सोडून धेडगुजरी कां बोलावे ? 'माझ्या फादरची

हेल्थ वुईक आहे' असे ह्मणणारे राजेश्री अिंग्रेजीत भाषण करीत असता किती अस्खलित व निर्मिश्रित वाक्ये बोलतात हे आपण पहातोच आहो. कोणतीही भाषा बोलायची झाली तरी ती निर्भेळपणेच बोलली पाहिजे.

दुसरी अेक गोष्ट ह्मणजे हल्ली अुर्दू, गुजराथी अथवा अिंग्रेजी शब्दांना आपल्या भाषेच्या विभक्त्या लाविल्या जाऊन मराठीत राजमान्य प्रयोग करण्यांत येत आहेत. उदाहरणार्थ "माझ्या 'ब्रदरला' त्या दिवशीच्या 'जखमेने' आठ दिवस पथारीत पडून रहावयास लाविले." या गोष्टीची विशेष काळजी घेतली पाहिजे. या सर्व दृष्टींनी कराचीस एक मित्रमंडळ अुत्कृष्ट काम करीत आहे. या मंडळींने मराठी भाषेत अिंग्रेजी शब्द येअूं द्यावयाचे नाहीत असा नियम केला आहे. नियमाचे अुल्लंघन करणाऱ्यास एक पै दंड ठेविण्यात आला असून ती रोख न घेता दुसऱ्याची चूक दाखवून दिल्यास फिटली जाते. यामुळे त्या मंडळाची शोधक वृत्ति वाढत आहे. ते वापरीत असलेल्या शब्दांपैकी काही शब्द येणे-प्रमाणे आहेतः— स्टेशन—टप्पा, रब्बर—शीसमर्दक, सॉर्टिंग डिपार्टमेन्ट—पत्रसंस्करण खाते अि०

वरील विवेचनावरून असे दिसून येईल की मराठीच्या शुद्धीकरणाचा हा महत्त्वाचा काल आहे. या वेळेस स्वस्थ राहिल्यास भविष्यात मराठी भाषा अत्यंत दूषित होईल. तेव्हां सर्वांनी आता

'तयार' होऊन 'हवे'ला 'रजा' देऊन आपल्या भाषेला 'आजतागायत' लागलेली इतर भाषांची 'नजर' काढून टाकून इतःपर 'हुशार' राहून 'अक्कल' खर्च करून आपल्या भाषेवर 'अंमल' बसविलेल्या परभाषेतील शब्दांची 'यादी' तयार करावी, आणि जेणेकरून त्या शब्दांनी मराठी भाषा 'जखमी' होणार नाही अशी काळजी घेतल्या'शिवाय' आज आपल्याला गत्यंतर नसल्यामुळे त्या यादीतील शब्द मराठीत येऊ न देण्याची 'खबरदारी' घ्यावी.

( संक्रांत १९२६. )

* * *

पंजाबाकडील एक ज्योतिषी मध्यंतरी अहमदाबादेस येऊन गेले व त्यांचें भविष्य खडान् खडा बरोबर असे असे ऐकतो. त्यांचेजवळ पूर्वकालीन भृगुसंहितानामक ग्रंथ असून त्यांत पत्रिका दाखविल्या घटकेपावेतो इत्थंभूत माहिती सांपडते. पत्रिका घेऊन येणाऱ्या मनुष्याचें नाव व त्याच्या मनांतील इच्छाही त्यांत नमूद केलेली पहावयास मिळते. एकदा एका गृहस्थाने महात्माजींची कुंडली त्यांस दिली तेव्हां ग्रंथात असे लिहिलेले सांपडले की या गृहस्थांस हल्ली करीत असलेल्या कामात पूर्ण यशःसिद्धि होणार नाही. पुढल्या जन्मी हे महाराष्ट्रांत जन्माला येणार असून यांच्या हस्ते स्वराज्याची प्राप्ति होईल. यांची कुंडली घेऊन तुमची परीक्षा पाहण्याकरिता शांतिदास (? लाल) नांवाचे

गृहस्थ तुमचेकडे येतील. यावरून कुतूहल वाटल्याविना रहात नाही.

अकूण महात्माजींच्या या जन्मांत स्वराज्य मिळत नाही हे आपले मंदभाग्य होय. तरी 'कर्मण्येवाधिकारस्ते' या श्रीकृष्णवचनानुसार आपण आपला प्रयत्न चालू ठेवलाच पाहिजे. महात्माजीना जन्मांतरीही स्वदेशस्वातंत्र्याचा ध्यास रहाणार हे वर्तमान आनंददायक असून नवलपरिप्लुतही आहे. अथवा त्यांत नवल तें कसलें ? कालिदासानें म्हटलेच आहे की '**भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि**' एकंदरीत स्वराज्यप्राप्तीकरिता महाराष्ट्रीयच पाहिजे अशी ईश्वरेच्छाच दिसते।

( संक्रांत १९२६. )

---



# मातेविषयी विचार.

लेखक श्री. गोविंद माधव देशपांडे.

कोकिळे, तूं कितीहीं सुस्वर कंठाने गाणे म्हण, कितीही अुंच स्वरात व मुक्तकंठाने गायन करून मला संतोष देण्याचा प्रयत्न कर, परंतु मी लहान असताना मला निजविण्याकरिता माझ्या पूज्य मातेने प्रेमाने ओबडधोबड आवाजात म्हटलेल्या गाण्याची सर तूं कितीही प्रयत्न केलेस तरी तुझ्या सुस्वर कंठांतून निघालेल्या गाण्यास यावयाची नाही.

हे वसुन्धरे, अीश्वरदत्त नैसर्गिक अलंकाराने तू आपली तनु पाहिजे तेवढी विभूषित कर, निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळी वस्त्रे आपल्या अंगावर घेऊन तू स्वतःस नटव, परंतु माझ्या साध्या मातेची सर तुला येणे अशक्य ओह.

हे रत्नाकरा, आपल्या विशाल व घनगर्जितानुकारी लाटानी तू सकल विश्वाला मनसोक्त चमत्कार दाखविण्याचा सर्व शक्तीचा अुपयोग करून प्रयत्न कर, पण माझ्या मातेची प्रेमाची अेकच लाट जो चमत्कार दाखवील तो हजारों वर्षे प्रयत्न करूनही तुला यावयाचा नाही.

